मोरोपंती

# सुबोध केकावलि.

[ प्रस्तावना, कविचरित्र, अर्थ, व टिप्पणी यांसह. ]


संपादक,

बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए.



प्रकाशक,

केशव भिकाजी ढवळे, बुकसेलर,

ठाकुरद्वार-मुंबई नं. ४.

मुंबई-मुंबईवैभव छापखान्यांत छापिली.

माघ शके १८४७. सन १९२६.

किंमत ८ आणे.

# केकावलि-प्रस्तावना.



'केकावलि' नांवाचीं दोन स्फुट प्रकरणें पंतांनीं रचिलेलीं आहेत, व त्यांत योजलेल्या वृत्तांवरून तीं 'आर्याकेकावलि' व 'श्लोककेकावलि' या नांवांनीं ओळखलीं जातात. परंतु श्लोककेकावलीच्या मानानें आर्याकेकावलीची प्रसिद्धि बरीच कमी असल्यामुळें, 'केकावलि' या सामान्य संज्ञेनें 'श्लोककेकावलि' काव्याचाच प्रामुख्येंकरून बोध होतो.

मोरोपंतांनीं 'आर्याकेकावलि' हें काव्य आपल्या ऐन उमेदींत म्हणजे पस्तिशीच्या सुमारास रचिलें, पण 'श्लोककेकावलि' या काव्याचा संभव त्यांच्या अगदीं वृद्धापकालांत, म्हणजे साठी उलटून गेल्यावर झाला. या दोन्ही काव्यांचे हेतु व प्रसंग भिन्नभिन्न आहेत. मोरोपंतांच्या कुटुंबावर कांहींतरी भयंकर लौकिक संकट येऊन गुदरलें असतां, त्या संकटांतून आपला बचाव व्हावा व स्वस्थ चित्तानें ईश्वरसेवा करण्यास आपल्यास अवसर मिळावा, म्हणून आर्याकेकावलीच्या द्वारें पंतांनीं रामप्रभूची व्यथित व सद्गदित अंतःकरणानें विनवणी व आळवणी केली आहे, ही हकीकत या पुस्तकास जोडलेल्या मोरोपंतचरित्रांत नमूद करण्यांत आली आहे. परंतु 'श्लोककेकावली'च्या रचनाकालीं अशा प्रकारच्या लौकिक संकटाचा पंतांना मुळींच संपर्क नव्हता. या वेळीं पंतांचा घरसंसार सुव्यवस्थित झाला असून, त्यांचे मुलगे कर्ते, विद्वान्, व प्रपंचाचा आटोप करणारे निघाले होते. यजमान पांडुरंगराव नाईक यांचा त्यांना चांगला आश्रय होता. शिवाय, पांडुरंगराव काव्यरसिक असल्यामुळें पंतांविषयीं त्यांच्या अंतरंगांत आदर, प्रेम, व भक्ति, वसत होतीं. यामुळें श्लोककेकावलीचा जेव्हां जन्म झाला, तेव्हां पंत जरी अत्यंत वृद्धावस्थेला पोंचले होते, तरी संसारामध्यें त्यांना कोणत्याही गोष्टीची ददात भासत नव्हती. त्यांना जिच्याबद्दल उत्कट उत्कंठा व तळमळ लागून राहिली होती ती काशीयात्राही यथासांग घडून पंत या वेळीं कृतकार्य झाले होते, व त्यांचें अन्तःकरण सर्व सांसारिक गुंत्यांतून सुटून परमार्थसाधनाकडे एकतामतेनें लागलें होतें. परंतु अशा सुस्थितींतही त्यांच्या मनाला आध्यात्मिक हुरहूर जाचत होती. आपण ईश्वरनाम-

स्मरण निरन्तर करीत असतों, आपलें सर्व कवित्व आपण प्रभुसेवेला लाविलें आहे, काशीप्रयागादि तीर्थक्षेत्रींचीं स्थानपाननिवासादि आपल्यास घडलीं आहेत, सत्संगति व सद्ग्रन्थवाचन यांचाही लाभ आपल्यास झाला आहे, भगवन्ताच्या भक्तवात्सल्यावर आपली अढळ श्रद्धा आहे, पण इतकें सर्व असूनही अद्याप पूर्ण वासनाक्षय व पापक्षालन होऊन आपल्या अन्तःकरणाचें खरें शुद्धीकरण व आत्म्याचा उद्धार झाला नाहीं, अशी तगमग पंतांच्या मनाला अखेरपर्यंत टोंचीत होती, व या तगमगीची वाङ्मयमूर्ति म्हणजे प्रस्तुतची केकावलि होय. हींत लौकिक आकांक्षा, सांसारिक संकटाचें निवारण, कीर्तीची हौस, द्रव्यप्राप्तीची कामना, वगैरे ऐहिक वृत्तींचा गंधही नाहीं. अन्तःकरणाची दुर्बळता, विषयवासनांची पकड, शंकाकुशंकांचें वारें, पापीपणाची जाणीव, व आत्मानंदाचें अनवभान, या आध्यात्मिक संकटांपासून आपली सुटका व्हावी म्हणून कवीनें या काव्यांत दयाघन व चिन्मय परमेश्वरास अत्यन्त आर्तरवानें आळविलें आहे. आपण पिकलें पान झालों आहों, मृत्यूचा काल फारच जवळ येत चालला आहे, त्याची उडी केव्हां पडेल याचा नेम मुळींच नाहीं, या कल्पनेनें पंतांच्या आर्तरवांत विशेषच आतुरता दिसून येते.

आमच्या संतांस व त्यांच्या अनुयायींस ब्रह्मसिद्धान्त पूर्णपणें अवगत व संमतही होता. ब्रह्म हें विश्वाचें आदिकारण असून तें सर्वगुणातीत आहे, व भासमान आणि दृश्यमान होणारें हें विश्व नाशवन्त व मायिक आहे, ही तत्त्वप्रणाली मान्य असूनही त्यांचा निर्गुणापेक्षां सगुणाकडेच बळकट ओढा दिसून येतो. एकदा सगुणाचा अंगीकार केला म्हणजे अवतारचरित्रें, सगुण मूर्तींमध्यें आवडनिवड, पूजा–अर्चेचे संस्कार व सोहाळे, नामभक्ति, देवभक्तांच्या नात्याविषयीं विविध कल्पना, इत्यादि गोष्टी ओघानेंच येतात. आमच्या संतमंडळीला सर्व देवता एकाच आदिपरमेश्वराचीं विविध सगुणरूपें म्हणून मान्य आहेत, तरी पण त्यांच्यांत बहुमतानें राम व कृष्ण हे दोन अवतार पूर्णांश व वरिष्ठ मानले जातात. समाधि, ध्यानधारण, व योगसाधन, यांचें महत्त्व जरी ते मान्य करितात, तरी नवविधा भक्ति, आणि तींतही नामभक्ति, हींच त्यांच्या ईश्वराराधनेचीं व परमार्थप्राप्तीचीं मुख्य व आवडतीं साधनें होत. त्यांनीं देवभक्तांमध्यें जो संबंध कल्पिला आहे, तो बराच बहुरंगी आहे. सेव्यसेवक, पितापुत्र, ऋणकोधनको, गुरुशिष्य, व मित्रामित्र या सर्व संबंधांचा अंशतः देवभक्तांच्या संबंधांत अन्तर्भाव होतो, असें संतांच्या

स्तोत्रादिकांवरून उघड होतें. यामुळें ते कधीं देवाला दासभावानें सेवितात व आळवितात, तर कधीं लाडक्या मुलाप्रमाणें त्याच्याशीं लगट करून रुसतात किंवा हट्ट करितात; कधीं प्रेमाची व वात्सल्याची याचना करितात, तर कधीं " भक्ति-ऋणाचा मोबदला दे, " म्हणून हक्कानें भांडतात; कधीं सन्मार्ग दाखवून व पापवासना निर्मूळ करून आपणास परमानंदस्थितीस पात्र करण्यासाठीं त्याला विनवितात, तर कधीं त्याला आपला परमसखा गणून बरोबरीच्या नात्यानें त्याच्याशीं संभाषण व वादविवाद करितात. मोरोपंतही संतांच्याच पंथांतील आहेत, व त्यांच्या धार्मिक अन्तःकरणाची भूमिका वर आंखल्याप्रमाणें आहे. कवीची ही ईश्वरविषयक मनोभूमिका ध्यानांत वागविली, म्हणजे प्रस्तुत केकावलीची गोडी, सुसंगतता, व सुरसत्व, वाचकांस पटल्यावांचून राहणार नाहींत.

'केकावलीस' स्तोत्रकाव्य म्हणण्यापेक्षां विज्ञप्तिकाव्य म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. नारायणाच्या रामकृष्णादि अवतारांतील लीलाविलासांत दिसून येणाऱ्या ईश्वरी विभूतीच्या गुणधर्मांवर या विज्ञापनेची उभारणी केली आहे, आणि लीलावतारी परमेश्वराला, कधीं स्वामी, तर कधीं उदार दाता; कधीं ऐश्वर्यसंपन्न प्रभु, तर कधीं सुखविलासांचा रसिकभोक्ता; कधीं भक्तांचा शरण्य, तर कधीं विश्वाचा पिता; कधीं भागवतांचा अंकित, तर कधीं पतितांचा उद्धारक; कधीं दुष्टांचा संहर्ता, तर कधीं दीन दुबळ्यांचा त्राता, कल्पून, आत्मोद्धाराविषयींच्या आपल्या विज्ञापनेचें समर्थन कवीनें नानापरींचे लौकिक दृष्टान्त, व्यावहारिक न्याय, व पौराणिक दाखले, देऊन केलें आहे. असें करितांना त्यानें कित्येक वेळां खुबीचे कोटिक्रम केले आहेत व पांडित्याचे वकिली डावपेंचही लढविले आहेत. आपली विज्ञापना प्रभूच्या गळीं उतरावी म्हणून कवीनें त्यास कधीं आळविलें आहे, तर कधीं गौरविलें आहे. आणि क्वचित् हिणाविलेंही आहे ! परंतु या सर्व स्थळीं कवीच्या प्रेमळ भावनेचाही प्रत्यय निश्चयेंकरून येतो. प्रेमळपणाच्या अंगभूत असलेल्या विनोदाच्या छटाही केकावलींत विपुल आढळतात. दोनतीन प्रसंगीं शृंगाराची चुणूकही पंतांनीं दाखविली आहे, परंतु अशा प्रसंगींही त्यानीं भारदस्तपणा व गांभीर्य या गुणांशीं फारकत केलेली आढळत नाहीं.

केकावलीची भाषासरणी घोटींव व ठास बांधणीची आहे. शब्दार्थालंकाराची रेलचेल सर्वत्र सारखी उडालेली आढळते. अगदीं थोड्या शब्दांत विपुल अर्थाचा

बार भरण्याची पंतांनीं शिकस्त केली असल्यामुळें हें उत्तम ध्वनिकाव्य झालें आहे, पण त्यामुळेंच तें बऱ्याच ठिकाणीं क्लिष्ट व दूरान्वयी बनलें आहे. परंतु अशी रचना पंतांच्या इतकी अंगवळणीं पडून गेली होती, कीं, तिला कृत्रिम म्हणणें सत्यास अगदीं सोडून होईल. केकावलि अर्थ करण्यास कितीही बिकट वाटली, तरी कवीची परिस्थिति व वाङ्मयिक योग्यता लक्ष्यांत घेतां, हें काव्य सहजोद्गारमय आहे, असें म्हणणेंच रास्त होईल. एकदा कवीच्या भाषेशीं चांगला परिचय झाल्यावर, हें काव्य पुन्हां पुन्हां वाचीत असतां, क्षणक्षणीं नवीनवी रुचि उत्पन्न होऊन वाचकास काव्यानंदाचा बहुमोल लाभ होतो यांत शंका नाहीं.

बा. अ. भिडे.



# मोरोपंत कवि.

## उपोद्घात.

इसवी सनाच्या अठराव्या शतकांत महाराष्ट्रांत व परप्रांतस्थ महाराष्ट्रीय समाजांत ज्यांचा यशोदुंदुभि दुमदुमून राहिला होता, अशा थोर विभूतींत मोरोपंत कवींची गणना होते. ज्यांनीं मराठी भाषेच्या अंगीं गीर्वाणवाणीची ऐट व ओज आणून संस्कृताभिमानी पंडितांसही तिच्या सेवेकडे वळविलें, ज्यांनीं पांडित्याच्या प्रौढीशीं काव्यकौशलाची व भक्तिभावनेची सांगड घालून वाङ्मयरसिकांना भुलविलें, ज्यांनीं प्राकृतसंस्कृताची सारासार विचारानें घडी बसवून व वाक्यरचना नियमबद्ध करून आधुनिक मराठी भाषेची तळघडी कायम बसविली, त्या मोरोपंतांचें स्थान महाराष्ट्र वाङ्मयांत अगदीं स्वतंत्र आणि अढळ आहे. मोरोपंतांच्या काव्यगुणांसंबंधें कितीहि मतभेद असला, तरी त्यांच्या वरील कामगिरीबद्दल दुमत होणें संभवनीय नाहीं. मराठीच्या कविमालेंतील या ठळक तेजस्वी मण्याचें अल्प चरित्र आम्हीं वाचकांस सादर करीत आहों.

## कुलवृत्त.

मोरोपंतांचें संबंध नांव ' मोरेश्वर रामचन्द्र पराडकर ' असें होतें. या पराडकरांचें मूळ ठिकाण रत्नागिरी जिल्ह्यांतील राजापुराजवळ असलेलें ' सौंदळ ' नांवाचें खेडें होय. सौंदळास निर्वाहाची पंचाईत पडूं लागल्यामुळें मोरोपंतांचे पणजे [1]रामाजीपंत हे उपजीविकेकरितां स्वदेश सोडून किल्ले पन्हाळगडीं इ. स. सतराव्या

---

१ उज्जयिनी ( उर्फ अवन्ति ) येथील तीर्थोपाध्यायांच्या चोपडींत मोरोपंत कवींचे बंधु आबाजीपंत यांचा माघ शु. १३, संवत् १८२६ या मितीचा एक लेख आढळला आहे. त्यावरून मोरोपंतांची तीनचार पिढ्यांची वंशावळ खालीं दिल्याप्रमाणें निश्चित होते.

रामाजीपंत ( पन्हाळगडीं रहिवास )
|
कृष्णाजीपंत
|
रामाजीपंत ऊर्फ बापूजी. — मेघश्याम.
|
सोनोपंत. — मोरोपंतकवि. — आबाजीपंत.

( रा. सरदेसाई व वाकसकर यांचें पत्र, केसरी २४-११-२५ )

शतकाच्या उत्तरार्धांत केव्हांतरी जाऊन स्थाईक झाले. रामाजीपंतांचा मुलगा कृष्णाजीपंत, व कृष्णाजीपंतांचे मुलगे दोन, एक रामाजी व दुसरा मेघश्याम. पैकीं मेघश्याम व त्याचे वंशज सौंदळास परत येऊन राहिले, व रामाजीनें पन्हाळगडींच्या संसाराचा आटोप केला. या रामाजीपंतांचें व्यावहारिक नांव ‘ बापूजी ’ असें होतें. इ. स. १७१३ चे सुमारास रामाजीपंतांस सरकारी अमलदारी मिळाली. पन्हाळगड हें त्या वेळीं कोल्हापुर राज्याचें सदर ठाणें होतें; त्यामुळें रामाजीपंतांची लवकरच ठाकठिकीची स्थिति झाली. नंतर त्यांचें किर्लोस्कर घराण्यांतील एका मुलीशीं लग्न झालें व त्या नववधूचें नांव ‘ लक्ष्मी ’ ठेवण्यांत आलें. या लक्ष्मीरामचंद्र दांपत्यास तीन मुलांचा लाभ झाला, पहिला सोनोपंत, दुसरा मोरोपंत, आणि तिसरा आबाजीपंत. दुसरे चिरंजीव हेच प्रसिद्ध मोरोपंत कवि, यांचा जन्म इ. स. १७२९ मध्यें पन्हाळगडीं झाला.

## बाळपण.

पराडकरांप्रमाणेंच रत्नागिरि जिल्ह्यांतील गोळवलकर पाध्यांपैकीं दोन विद्वान् भाऊ, केशव व गंगेश, पन्हाळगडास तनुनिर्वाहाकरितां येऊन राहिले होते. यांनीं आपलें घर पराडकरांच्या घराशेजारींच पाल्यास पाखें लावून बांधिलें होतें. या दोन्ही कुटुंबांचा परस्पर जिव्हाळ्याचा घरोबा जमला होता. पाध्ये बंधु यांचा विद्वत्तेबद्दल दांडगा लौकिक होता. त्यांना राजाश्रयहि लाभला होता. त्यांच्या घरीं व्याकरणशास्त्रकाव्याध्ययनासाठीं बरेच विद्यार्थी येत असत. मोरोपंतांची मुंज झाल्यावर एक दिवस ते पाध्यांकडे द्वादशीचे ब्राह्मण गेले होते. तेव्हां जेवणास जरा अवकाश असल्यामुळें, हा सोंवळ्याची लंगोटी नेसलेला मोरू पराडकर मागील दारीं इकडे तिकडे करीत असतां, त्यानें एक कोळशाचा तुकडा घेऊन, भिंतीवर एक श्लोक सहज खरडला. या सहजासहजीं खरडलेल्या श्लोकानें आपल्या आयुष्याची रूपरेखा आंखली जाणार आहे, हें मोरूच्या ध्यानींमनींहि आलें नसेल ! जेवणखाण आटोपल्यावर केशव पाध्ये मागील दारीं गेले असतां, तो भिंतीवरचा श्लोक सहज नजरेस पडून त्यांनीं वाचला, आणि तो त्यांना इतका आवडला कीं, हा कोणी लिहिला, म्हणून त्यानीं बारकाईनें चौकशी केली, आणि, ही मोरू पराडकराची कृति आहे, असें समजतांच, त्यांनीं रामजीपंतांस सांगितलें, कीं, “ हा मुलगा मोठा बुद्धिमान् दिसतो ! यास उद्यांपासून आमच्याकडे अध्ययनास ठेवा. ” झालें, सूचना अंमलांत आली, व मोरोपंतांचा गुरुगृहवास अकराव्या वर्षी सुरू झाला, आणि तो सुमारें एक तप अस्खलित चालला

## अध्ययनकाळ.

मोरोपंत पाध्यांकडे विद्यार्थ्याच्या नात्यानें राहूं लागल्यावर थोड्याच दिवसांनीं रामाजीपंत पराडकरांच्या तापट स्वभावामुळें त्यांस कोल्हापुरकरांच्या आश्रयावर पाणी सोडून, पन्हाळगडास कायमचा रामराम ठोकावा लागला, परंतु त्यांनीं मोरोपंतांना पाध्यांकडेच ठेविलें. बाकीच्या सर्व कुटुंबासह ते पन्हाळगडाहून निघून बारामतीस बाबूजी नाईक जोशी यांजकडे आश्रयार्थ आले. तेथें त्यांस कोठवळ्याची असामी मिळून चांगली सोय लागली. इकडे मोरोपंत पाध्यांच्या घरीं सरस्वतीची उपासना मोठ्या साक्षेपानें व आतुरतेनें चालवीत होते. ते बुद्धिवान्, उद्योगी, रसिक, विनयी व मितभाषी असल्यामुळें त्यांनीं उभयतां गुरुजींची—केशव व गणेश पाध्यांची—प्रसन्नता संपादिली. या शिष्यरत्नाची त्यांस चांगलीच पारख झाली, आणि मोरोपंतांनींहि त्यांचा प्रेमळपणा व थोरपणा आठवून, मोठ्या कृतज्ञतेनें त्यांचीं नांवें आपल्या काव्यांत गोंवून अजरामर करून ठेविलीं आहेत. मोरोपंतांचें व्याकरण, साहित्य, व काव्य, या विषयांचें अध्ययन विशेषतः केशव पाध्यांजवळ झालें, आणि त्यानें पंतांच्या अन्तरंगांत असलेल्या काव्यबीजाचें परिपोषण होऊन त्यास लवकरच चांगले ठसठशीत अंकुर फुटूं लागले. केशव पाध्यांना दोन मुलगे होते. एक सदाशिव व दुसरा यज्ञेश्वर. पैकीं सदाशिव पाध्ये हा मोरोपंतांचा समवयी असून अत्यन्त सलगीचा सोबती होता. या दोघांनीं गडावर तीं बारा वर्षें परस्परांच्या सहवाससुखांत, अध्ययनोद्योगांत, काव्यानंदांत, व साहित्यविनोदांत, घालविलीं. या वेळीं त्यांचा जो लोभ जडला, तो, पुढें त्यांची तातातूट झाली, तरी आमरणान्त टिकला. मोरोपंतांनीं बरींच काव्यें सदाशिव पाध्यांच्या प्रेरणेवरून रचलेलीं आहेत. अशा रीतीनें गुरुगृहीं अध्ययन करीत असतां, व आपण केलेल्या नवीन काव्यकृतीचें कौतुक आपल्या संवगड्याकडून अनुभवीत असतां, त्यांचा धाकटा भाऊ ‘ आबा ’ हा अध्ययनोचित वयाचा झाल्यामुळें रामाजीपंतांनीं त्यासहि बारामतीहून पन्हाळ्यास पाध्यांकडे पाठविलें. या वेळीं मोरोपंत विशीच्या भरांत होते, व आतां आपणा दोघां भावांचा भार पाध्यांवर घालणें योग्य नाहीं असें मनांत निश्चित करून, त्यांनीं आपल्या स्वतःच्या घरीं रहावयास जाऊन, गडावरच कारकुनी फडांत नोकरी पत्करली. मोरोपंत जरी केशव पाध्यांकडे संस्कृत शास्त्रसाहित्याचें अध्ययन करीत होते, तरी ते चांगले कारकूनही होते. त्यांचें मोडी अक्षर बालबोध

अक्षराप्रमाणेंच उत्तम घटींव व रेखींव होतें. ते व्यवहारचतुर असून हिशेबांतही वाकबगार होते. हें कारकुनी काम पंतांनीं सुमारें तीन वर्षें केलें. पण एक दिवस हिशेबांत कांहीं चूक होऊन, पाव आण्याची तफावत पडूं लागली. तेव्हां पंतांनीं तेवत्या समईजवळ तीन प्रहर रात्रीपर्यन्त जागून, उलटसुलट ताळे करून, अखेर चूक शोधून काढली, व त्या आनंदाचे भरांत त्यांनीं मोठ्यानें टाळी वाजविली. हा टाळीचा आवाज झोंपेंत गुंग असलेल्या त्यांच्या वरिष्ठांच्या कानीं पडला, व ते कारकुनी खोलींत काय प्रकार चालला आहे, तें पाहण्याकरितां उठून आले. पंतांना येथें समईजवळ हिशोबी कागद इतक्या अपरात्रीं चाळीत असतांना पाहून ते आश्चर्यचकित झाले, पण पंतांची सर्व हकीकत ऐकून, ते प्रेमानेंच, पण जरासें खोंचून, त्यांस म्हणाले, "मोरोबा ! पाव आण्याची चूक शोधून हिशोब जुळल्याबद्दल जर तुला एवढा आनंद झाला, तर ही संसाराची घोडचूक शोधून एकाग्रतेनें व भक्तिभावानें जीवाशिवाचा हिशेब जुळविल्यास जन्माचें सार्थक होऊन केवढा आनंद पदरीं पडेल बरें ?" हे शब्द मोरोपंतांच्या मूळच्याच श्रद्धाळू, भक्तिप्रवण, व मोक्षोत्सुक, मनांत खोल मुरून ठसले, व त्यांचा कारकुनी पेशा त्याच वेळीं सुटला, तो कायमचाच ! यानंतर लौकरच म्हणजे इ. स. १७५३ सालीं गुरुगृहींचा एक तपाचा रहिवास पुरा करून, मोरोपंत बारामतीस वडिलांजवळ राहण्यास गेले.

## पन्हाळगडावरील काव्यग्रथन.

पन्हाळगडास असतांना पंतांनीं आपलें पहिलेंच खंडकाव्य 'कुशलवचरित्र' जैमिनिकृत अश्वमेधपर्वावरून रचिलें होतें. हें काव्य जरी मुख्यतः जैमिनिकृतीच्या आधारावर रचिलें आहे, तरी यांत जागोजाग जो रघुवंशाचा अनुकार केलेला आढळतो, त्यावरून या वेळीं पंतांच्या डोक्यांत रघुवंशांतील श्लोक विशेष घोळत होते हें उघड ठरतें. पंतांच्या दप्तरांत खुद्द त्यांच्याच हातची रघुवंशाची पोथी आढळते, तिच्यावर ती पन्हाळगडीं इ. स. १७५० सालीं उतरल्याचा स्पष्ट उल्लेख आहे, तेव्हां 'कुशलवचरित्र' हें याच वर्षीं लिहिलें असावें, असें अनुमानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. जैमिनीचा आधार जरी पंतांनीं या काव्याला घेतला आहे, तरी जैमिनिकृतींत ज्यांना मुळींच जागा नाहीं, अशा अनेक गोष्टी पंतांनीं यांत आणिल्या आहेत, व त्यांत रघुवंशाचें अर्थशः व शब्दशःही केलेलें अनुकरण अगदीं उघड आहे. याचे दोनच मासले येथें देतों. रानांत सोडलेल्या सीतेनें रामास निरोप

पाठविल्याचें पंत वर्णितात, परंतु असा निरोप जैमिनिकृतींत नाहीं, तर रघुवंशांत आहे. या निरोपांतील कांहीं स्थळें अशीं आहेत—

रघुवंश—**मां लोकवादश्रवणादहासीः,**
**श्रुतस्य किं तत्सदृशं कुलस्य ?** स० १४।६१
**ममैव जन्मान्तरपातकानां**
**विपाकविस्फूर्जथुरप्रसह्यः** स० १४।६२

मोरोपंत—**अन्तर्वत्नी पत्नी त्यजिली त्वां जेंवि पांसुला रामा;**
**हें काय विहित तुझिया कुळास, शीळास ? पंडिता रामा !**
कुश० ४।६०
**अपराधवियुक्ता मी, परि मज त्यजिलें वनांत भूमिवरें.**
**बुध म्हणति, 'दैव दुस्त्यज,' तें आलें प्रत्ययास आजि बरें.**
कुश० ४।५४

रघुवंश—**किं वा तवात्यन्तवियोगमोघे**
**कुर्यामुपेक्षां हतजीवितेऽस्मिन्,**
**स्याद् रक्षणीयं यदि मे न तेजस्**
**त्वदीयमन्तर्गतमन्तरायः ?** स० १४।६५

मोरोपंत—**त्वत्पादपद्मभजनाविण भारभूतें**
**या जीवितेंकरुनि केवळ भार भूतें.**
**टाकूं जरी त्वरित निंद्य कलेवराला,**
**विघ्नस्वरूप तव वीर्यनिषेक झाला.** कुश० ४।५६

रघुवंश—**साऽहं तपः सूर्यनिविष्टदृष्टिर्**
**ऊर्ध्वं प्रसूतेश्चरितुं यतिष्ये,**
**भूयो यथा मे जननान्तरेऽपि**
**त्वमेव भर्ता, न च विप्रयोगः.** स. १४।६६

मोरोपंत—**प्रसूति झाल्यावरि, देहनाथा !**
**करीन मी तीव्र तपःप्रयोगा,**
**जन्मान्तरीं होउनियां तुझी स्त्री,**
**जेणें न पावें क्षण विप्रयोगा.** कुश० ४।५८.

जैमिनीचा आधार नसतांना रघुवंशाचा स्पष्ट अनुकार केल्याचीं आणखी दोनतीन उदाहरणें सादर करितों.

रघुवंश—उत्खातलोकत्रयसंकटेऽपि
सत्यप्रतिज्ञेऽप्यविकत्थनेऽपि,
त्वां प्रत्यकस्मात् कलुषप्रवृत्ता–
वस्त्येव मन्युर्भरताग्रजे मे ॥ स० १४।७३

मोरोपंत—केलें दुष्कर देवकार्य, सकल क्ष्मादेव केले सुखी,
न्यायें भूपति पाळितो निजजनक्लेशाटवीचा शिखी;
माझा क्रोध तथापि, मैथिलसुते ! आहेच रामावरी,
दोषावांचुनि टाकिली अकरुणें सत्वोदरी सुंदरी.
कुश० ५।७

रघुवंश—तवोरुकीर्तिः श्वशुरः सखा मे,
सतां भवोच्छेदकरः पिता ते,
धुरि स्थिता त्वं पतिदेवतानां,
किं तन्न येनासि ममानुकंप्या ? स० १४।७४

मोरोपंत—सर्व ज्ञानिजनासि संमत असा श्रीमैथिल त्वत्पिता,
वत्से ! तूंहि पतिव्रताजनशिरोभूता जगत्पूजिता,
माझा केवळ तो सखा दशरथ क्षोणीशचूडामणी,
या वेळेसि कशी न होशिल दयापात्र, क्षितिस्वामिणी ?
कुश० ५।६

रघुवंश—विनोदयिष्यन्ति नवाभिषंगाम्
उदारवाचो मुनिकन्यकास्त्वाम्.
तपस्विसंसर्गविनीतसत्वे
तपोवने वीतभया वसास्मिन्.
इतो भविष्यत्यनघप्रसूतेर्
अपत्यसंस्कारमयो विधिस्ते.
तन्मा व्यतिष्ठा, विषयान्तरस्थं
प्राप्तासि वैदेहि ! पितुर्निकेतम्. स० १४।७७,७५,७२

मोरोपंत—मदाश्रमपदाश्रितास्थिरचरासहि व्यापदा
कदापि न शिवे, सुखी विगतवैर सारे सदा.
उदास हृदयीं न हो, द्विजवधूसुता शर्मदा
न दावितिल भिन्नता तुज महानुकंपास्पदा.
होइल सुखप्रसूती, अपत्यसंस्कारविधिहि, भूतनये!
वत्से? मदाश्रमाला मानुनियां स्वगुरुचें निकेतन, ये.

कुश० ५।९।१०

उतारे फार झाले; परंतु हें अर्थसादृश्य सहजासहज योगानें आलें नाहीं, हें दाखविण्याला ते अवश्य होते. मोरोपंतांच्या या काव्यांत भाषेचा बोजडपणा बराच अनुभवास येतो, आणि अपरिचित संस्कृत शब्द व लांबलांब सामासिक पदें यांचीही रेलचेल उडाली आहे. शिवाय, वरील उताऱ्यांवरून वाचकांच्या हेंही सहज लक्ष्यांत येईल कीं, रघुवंशकारांचें शब्दसौष्ठव, कल्पनाचातुर्य, व मार्मिक खुब्या, हीं काव्य-प्रांगणांत नुकत्याच डोकावूं लागणाऱ्या या कच्च्या कवीच्या प्रतिकृतींत फारच अल्पांशानें उतरलीं आहेत. शब्दालंकाराचा थाट पुष्कळ आहे. वृत्तवैचित्र्यहि बरेंच आहे. परंतु ज्या अंत्य यमकांसंबंधें मोरोपंती धाटींत वैशिष्ट्य दिसून येतें, तीं अंत्य-यमकें या काव्यांत नीटशीं साधलेलीं आढळत नाहींत. 'पुसे–वसे' १।१६; 'सिंधो–बंधो' ४।५५, ५।३६, ९।४, ११।७; 'नातें–तीतें' ४।८६; 'गेला–झाला' ५।२५. 'पदाती–घेतीं' ११।५; 'आपटे–फुटे' १३।२५ इत्यादि कितीतरी यमकें या काव्यांत मोरोपंती दंडकाविरुद्ध आढळतात; म्हणजे, या बाबींत मोरोपंतांच्या मोडीची ठी अद्याप बसावयाची होती, हें उघड आहे. या सर्व कारणांवरून 'कुशलवचरित' हेंच पंतांचें पहिलें मोठें खंडकाव्य होय व त्याची रचना पन्हाळगडीं रघुवंशाचें लेखन चालू असतां इ. स. १७५० मध्यें झाली, असा निर्णय करितां येतो. या काव्यांत दिसून येणारा रोंख जर पुढें टिकला असता, तर पंतांच्या हातून संस्कृतां-तील महाकाव्यांच्या धर्तीवर बरींच काव्यें उतरलीं असतीं, यांत संशय नाहीं. परंतु यानंतर लवकरच पंतांनीं निश्चित केलेला पुराणिकाचा व्यवसाय, सामान्य जनांत नवीन कविकृति प्रसृत करणाऱ्या कीर्तनकारांची गरज भागविण्याची आवश्यकता, सदाशिव प्राध्यांसारख्या स्नेहल वाचकांची अभिरुचि, व स्वतांची भगवत्सेवा करण्याची श्रद्धाळू हौस, या कारणसमवायानें पंतांची नजर संस्कृत महाकाव्यांवरून उडून, जी एकदां

पुराणग्रंथ व भगवद्भक्ति यांकडे वळली, ती तेथेंच जन्मभर स्थिरावली! यानंतर सदाशिव पाध्यांच्याच प्रेरणेनें 'कृष्णामाहात्म्य' हें खंडकाव्य पंतांनीं रचिलें असावें, असें वाटतें. या काव्यांत 'कुशलवचरिता' प्रमाणेंच वृत्तवैचित्र्य आहे. पण आर्यांचा भरणा जास्त आहे. अंत्ययमकांची टापटीप चांगली राखली आहे. भाषा गंभीर व प्रौढ आहे, आणि बोजडपणा व सामासिक पदांनीं येणारी क्लिष्टता, हे दोषही तिच्यांत नाहींत. पंत उपसंहारांत म्हणतात—

**स्वगुरुपुत्र सदाशिव पंडितें, सुरसिकें, निजसद्गुणमंडितें,**
**लिहविलें परमाद्भुत सह्यजायश, म्हणे कलिकाळ 'असह्य' ज्या.**

या नंतर पन्हाळगडीं पंतांनीं सदाशिव पाध्यांनीं विनंति केल्यावरून एक मोठें काव्य केलें, तें 'ब्रह्मोत्तरखंड' होय. यांत शिवलीला वर्णिल्या आहेत. हें सबंध काव्य आर्यावृत्तांत रचिलें आहे. हें वृत्त पंतांना विशेष आवडतें व सोईचें झालें, असें दिसतें, व यानंतरच्या काव्यग्रथनास त्यांनीं बहुशा याच वृत्ताचा अंगीकार केलेला आढळतो. या वृत्तांत त्यांची रचना जितकी साधी, सरळ व सरस, वठते, तितकी इतर वृत्तांत वठलेली दिसत नाहीं. या काव्याच्या उपसंहारांत पंत सांगतात, कीं, "गुरुकृपेनें मला शिवकथेचा छंद लागला आहे, व गुरुबंधूची प्रेरणा तीच ईश्वरी आज्ञा समजून मी हा ग्रंथ लिहिला, व त्यानें माझें मन फार शांत झालें आहे."

**श्रीशिवकथा यथामति लिहिली हे रामनंदनें बाळें,**
**भाळें ईस, असें मज केलें गुरुपदरजःप्लुतें भाळें.**
**साधुसदाशिववदनें आज्ञा ज्या ईश्वरें मला केली,**
**त्या लिहुनि वाहिला हा शिवकीर्तिग्रंथ, हृद्व्यथा गेली.**

अ० २२।७५,७६

पुढें पंत म्हणतात, "हा ग्रंथ मी आर्यावृत्तांत रचिला आहे, आणि मी नवीनच कवि आहें. परंतु आत्मा शुद्ध करण्याकरितां मी लवकरच आणखीहि हांक मारून तुम्हांजवळ सहृदयत्वाची याचना करणार आहें—

**शिवकीर्तिग्रंथ ललित रचिला भावें करून आर्यांहीं,**
**करुणा करुनि सकृत् तरि वाचावा हा समूळ आर्यांहीं.**
**विनवितसें साधूंतें, आणिकाहि देवूनि हाक विनवीन,**
**कीं आशुचि शुचि होवू, सद्यश सेवूनि, हा कवि नवीन."**

अ० २२।७८,८०.

## बारामतीकरांचा आश्रय.

याप्रमाणें आर्यावृत्तांत नवीन नवीन भगवद्भजनपर ललित ग्रंथ रचण्याची ग्वाही दऊन, हे ' नवीन कवि ' लवकरच, मागील विषयपरिच्छेदान्तीं उल्लेखिल्याप्रमाणें, पन्हाळगडाहून बारामतीस वडिलांकडे आले. बारामतीस आल्याबरोबर पंतांना बारामतकरांचा आश्रय लाभला नाहीं. परंतु त्यांचीं पन्हाळगडाप्रमाणें येथेंहि वाचन, लेखन, व नवकाव्यरचना, हीं कामें सारखीं चालूच होतीं. " ब्रह्मोत्तरखंडाच्या " आर्यांची बरीच वाहवा झाली असें दिसतें; कारण, सदाशिव व यज्ञेश्वर पाध्यांनीं आतां मुद्दाम निरोप पाठवून ' मदालसोपाख्यान ' लिहिण्याची सूचना केली, व पंतांनींही ती, आर्यावृत्त अंगीकारून, यथास्थित अंमलांत आणिली.

**श्रीमद्गुरुपुत्रांहीं आज्ञा केली निरोप पाठवुनी.**
**श्रीरामसुतमयूरें लिहिलें श्रीहरिहरांघ्रि आठवुनी.**

अ० ६।७२

आतां पंतांच्या आर्यांचा सौगंध बराच फैलावूं लागला, व त्यांनीं निरनिराळ्या पुराणांतून निवडून हरिदासोपयोगी अशीं बरींचशीं छोटेखानी प्रकरणें, प्रायः आर्यावृत्तांत, पण क्वचित् इतर वृत्तांतहि, रचिलीं. यांत सप्तशती, हरिश्चंद्राख्यान, अनंतव्रतकथा, मल्लारिविजय, भस्मासुरआख्यान, दत्तचरित्र, हीं प्रमुख होत. याच सुमारास त्यांनीं सीता, रुक्मिणी, व सावित्री, या तीन पौराणिक सतींवर मुलींना म्हणण्यास योग्य अशीं, झोंपाळ्यावरील ओंव्यांच्या चालीवर, तीन सुंदर गाणीं रचिलीं. हीं गाणीं बारामतकरांच्या वाड्यांतील बऱ्याच मुलींनीं पाठ करून म्हणण्याचा परिपाठ पाडला. पंतांच्या आर्याबद्ध पौराणिक आख्यानांचा हरिदासांत व रसिक पंडितांत बराच प्रसार होऊं लागला, व कित्येक लोक मोठ्या उत्सुकतेनें त्यांच्या ग्रंथांच्या प्रति करून घेण्याकरितां बारामतीस येऊं लागले. तरीपण अद्याप पंतांना बारामतकरांचा प्रत्यक्ष आश्रय मिळाला नव्हता. बारामतकर बाबूराव सदाशिव जोशी नाईक, हें त्या वेळचें महाराष्ट्रांतील एक मोठेंच प्रस्थ होतें. ते मोठे महत्त्वाकांक्षी, मुलुखगिरी करणारे बहादर, मुत्सद्दीगिरींत तरबेज, व सराफीसावकारींत निष्णात, असे चतुरस्र होते. पुण्याच्या भट पेशव्यांशीं त्यांचें सोयरे, सावकार व प्रतिस्पर्धी, असें तिहेरी नातें होतें. बाळाजी विश्वनाथ भटांची कन्या, भिऊबाई, बाबूजी नायकांचे कनिष्ठ बंधु आबाजी नाईक यांस दिली होती. पण सोइरकीबरोबरच

बाबूजींनीं पेशव्यांशीं सावकारकीहि जोडली होती, व त्यामुळें वितुष्टपणाचें बीज चांगलेंच रूढावलें. पहिल्या बाजीरावांना नायकांचे तगादे सोशीत असतांनाच मृत्यूनें गांठलें. बाजीरावांनंतर पेशवाईचीं वस्त्रें नानासाहेब भटांस न मिळतां आपणास मिळावीं म्हणून बाबूजींनीं साताऱ्यास शाहू महाराजांकडे पुष्कळ संधानें बांधून खटपट केली, पण त्यांत अपेशच त्यांचे पदरांत आलें. पुढें कर्नाटकाची सुभेदारी आपल्यास लाभावी, म्हणून बाबूजींनीं भगीरथ प्रयत्न केले, परंतु त्यांतहि पेशव्याच्या प्रतिरोधामुळें त्यांस यश आलें नाहीं. परंतु इ. स. १७५२ सालचे सुमारास, शाहू महाराजांच्या मृत्यूनंतर, ताराबाईच्या कृपेनें बाबूजींचें वैभव बरेंच उजळलें. शाहू महाराजांच्या हयातींतच बाबूजींना इ. इ. १७४३ सालीं पुण्याजवळील बारामती महालाची जहागीर मिळाली होती, आणि आतां ताराबाईच्या राजवटींत ते "हुजूर मामल्याचे कमाविसदार" होऊन सालीना १८ लक्ष उत्पन्नाचे साडे एकूणसाठ महाल मिळविते झाले. शिवाय, त्यास "फत्तेसिंग भोंसल्याची बाबत, भागानगरचा देशमुखीचा हक्क, सरकार परंड्याचा नऊ तर्फांचा व बारा गांवांचा सरंजाम," इतक्या बाबींचा लाभ झाला. हें ज्या वर्षीं घडलें, त्याच सुमारास, म्हणजे इ. स. १७५३ सालीं, मोरोपंत पराडकरही पन्हाळ्याहून बारामतीस राहावयास आले. पंत सुमुहूर्तावर बारामतीस आले खरे, पण यजमानापर्यंत त्यांची दाद लवकर लागेना. बाबूजी नाईक हे विद्वान्, रसज्ञ, व काव्यलोलुप होते असें नाहीं. परंतु त्या काळीं ज्याप्रमाणें गुणिजनांच्या गुणांची चीज श्रीमन्तांच्या आश्रयावांचून होत नसे, त्याप्रमाणेंच श्रीमंतांच्या वैभवाची खुलावटही आश्रित वर्गाशिवाय घडत नसे, ही गोष्ट नाईक जाणून होते. तशांत भट पेशव्यांशीं स्पर्धा करण्याची हौस ! यामुळें नाइकांच्या आश्रयाला बारामतीस बरेच वैदिक, याज्ञिक, शास्त्री, पंडित, होते असें दिसून येतें. बाबूजींचें घराणें जरी आतां गृहस्थी बाण्याचें झालें होतें, तरी त्या वेळच्या संप्रदायाप्रमाणें नित्य ब्रह्मकर्मापुरती वेदविद्या, गीता, विष्णुसहस्रनाम, इत्यादिकांचें पठण, व जुजबी संस्कृताचें ज्ञान, इतकं शिक्षण त्यांस लाभलेंच असलें पाहिजे. शिवाय ते धार्मिक, भाविक, व उदार शिवोपासक होते. बाबूजी जरी नेहमीं सावकारकी, मुत्सद्देगिरी, अगर मुलुखगिरी, यांत गढलेले असत, तरी त्यांचे वाड्यांत पुराणें, कीर्तनें, धार्मिकविधि, उत्सव, वगैरे यथास्थित होत असत, आणि खाशी स्वारी चातुर्मास्यांत बहुशः घरींच असल्यामुळें स्वतः आदरानें पुराणश्रवण करीत असे. मोरोपंतांनीं बाबूजींच्या विद्वत्तेबद्दल अगर रसिकतेबद्दल कोठेंहि उल्लेख केलेला नाहीं,

पण त्यांचा अभिमान, धार्मिक बुद्धि, बाणेदारपणा, या गुणांचें वर्णन पंतांनीं दोन-चार ठिकाणीं केलें आहे. पंतांच्या शब्दांनीं सांगावयाचें म्हणजे बाबूजी नाईक हे "दाते, वक्ते, योद्धे, तेजस्वी, मानधन, व असामान्य" (कर्णपर्व–उपसंहार) होते. ते 'धीर वीरहीर' असूनही 'श्रीसिद्धेश्वराच्या दयाप्रसादास' आपल्या उपासनेनें 'पात्र' झाले होते. (आर्याभारत–उपसंहार). विष्णुपदवकीलींत पंतांनीं बाबूजींची "श्रीगायत्री-गीता-गंगा-सिद्धेश्वरैकभक्त" अशी शिफारस केलेली आहे. एकंदरींत बाबूजी नाईक जरी साहित्यरसिक नव्हते, तरी ते लौकिकासाठीं तरी विद्वद्रत्नांना औदार्यानें आश्रय देत, आणि या औदार्यांत त्यांच्या धार्मिक व भाविक बुद्धीनेंही बरीच भर पडली होती. मोरोपंत बारामतीस आले, परंतु त्यांची बरींच वर्षेपर्यंत यजमानाकडे दाद लागलेली दिसत नाहीं. पंत या सुमारास पितृत्वपदाला पोंचून चांगलेच संसारी झाले होते. रामाजीपंतांनीं पन्हाळगड सोडण्यापूर्वींच मोरोपंतांचा विवाह त्यांच्या १२ व्या वर्षाचे सुमारास पन्हाळगडींच झाला असावा, हें उपलब्ध पुराव्या-वरून निश्चित होतें. रामाजीपंत मोरोपंतांस पाध्यांकडे अध्ययनास ठेवून बारामतीस आले, त्यावर या बापलेकांची भेट जवळजवळ बारा वर्षें मुळींच झाली नाहीं. या-संबंधें रा. पांगारकर लिहितात, "पित्याची भेट होऊन बारा वर्षें होत आलीं; लवकर भेट घेतली नाहीं तर शास्त्रपद्धतीनें शंकराच्या देवळांत ती घेण्याचा प्रसंग येणार, हें जाणून मोरोबा पितृदर्शनास जाण्यास निघाले." (मोरोपंतांचें चारित्र, पान २३). यानंतर पंत इ. स. १७५३ सालीं म्हणजे आपल्या वयाच्या चौवी-साव्या वर्षीं, वरील हेतूनें बारामतीस आले, आणि त्यांस पुढच्याच वर्षीं, म्हणजे इ. स १७५४ सालीं, आपल्या वयाचे पंचविसाव्या वर्षीं पहिला मुलगा 'रघुनाथ' हा झाला. तेव्हां पंतांचा विवाह रामाजीपंतांनीं पन्हाळा सोडण्यापूर्वींच केला होता, हें स्वयंसिद्धच आहे. पाध्यांकडे पंत राहात असत, परंतु ते विशीच्या भरांत आल्यावर त्यांची पत्नी रमाबाई संसारक्षम झाल्यामुळें त्यांनीं पन्हाळा येथील आपल्या वडिलार्जित घरांत निराळा संसार थाटला. याच सुमारास त्यांचा भाऊ आबाही अध्ययनासाठीं तेथें येऊन राहिला आणि संसारखर्च भागविण्याकरितां पंतांनीं कारकुनी फडांत नोकरी पत्करली. ती नोकरी कशी सुटली, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. इ. स. १७५२ (शा. श. १६७४) या वर्षीं पंतांनीं नैषधोदय, अनर्घ्यराघव, मुरारिनाटक, ह्या तीन संस्कृत ग्रंथांच्या नकला आपल्या हातानें केलेल्या उपलब्ध आहेत. त्या नकला पाराशरक्षेत्रीं "स्वकृते स्वगृहे" केल्याचा स्पष्ट लेख आहे. तेव्हां इ. स. १७५२

सालीं पंत पन्हाळगडीं स्वतंत्र रीतीनें आपल्या स्वतःच्या घरांत संसार थाटून राहिले होते, हें अगदीं सिद्ध आहे. असो. अशा रीतीनें पंत बारामतीस आल्यावर त्यांचा संसाराचा व्याप वाढूं लागला. वडिलांच्या प्राप्तीवर प्रपंच चालणें अशक्य झालें. या विवंचनेचा परिणाम पंतांच्या काव्यकर्तृत्वावरहि होऊन त्यांची स्फूर्ति कांहींशी मंद पडली असावी. परंतु योगायोगानें त्यांना या अडचणींत अकस्मात् टेंका मिळाला आणि पंतहि त्याला चिकटून आमरणान्त कृतज्ञबुद्धीनें राहिले. एकदां बाबूजी नाईक वाड्यांत असतांना, कांहीं मुली झोंपाळ्यावर ओंव्या म्हणत होत्या. या ओंव्या पंतांच्या सतीगीतांतील होत्या. त्या बाबूजींच्या कानीं पडतांच नव्याशा वाटल्यामुळें त्यांचें लक्ष्य त्यांकडे वेधलें. तेव्हां त्या ओंव्यांची बांधेशुद्ध रचना, अर्थगौरव, विचार-गांभीर्य, यमकांची थाटी, वगैरे पाहून त्यांची जिज्ञासा जागी झाली, आणि यांचें कर्तृत्व रामाजीपंत पराडकरांचे चिरंजीव मोरोपंडित यांजकडे आहे असें त्यांस समजलें. तेव्हां बाबूजींनीं पंतांना बोलावून समक्ष चौकशी केली, व त्यांची योग्यता, विद्वत्ता, व बुद्धिमत्ता, अजमावून, त्यांस पांचशें रुपये वार्षिक नेमणूक करून देऊन आपल्या वाड्यांत पुराण सांगण्यास ठेविलें. याप्रमाणें बाबूजी नाइकांनीं एका एकनिष्ठ व अत्यंत कर्तृत्ववान् सरस्वतीभक्तास संसाराच्या पेंचांतून सोडवून व अभ्यास लावून मराठी भाषेस ऋणी करून ठेविलें. मोरोपंत विष्णुपदवकिलींत सांगतात—

**श्रीबाबूराव प्रभु माझा अत्यन्त सदय अन्नद, हा**
**अर्थिजना न म्हणों दे तैसा, तनास जेविं सन्नद, ' हा ! '**

आर्याभारताच्या उपसंहारांत ते म्हणतात—

**भीष्मद्रोणसम गुणें, शांडिल्यसुगोत्रपद्यरवि, दे हा**
**आश्रय, शंकर जैसा उपमन्युमना, मयूरकविदेहा.**

## पंतांचा काव्यप्रपंच.

कुटुंबनिर्वाहाची बारामतकरांच्या आश्रयानें याप्रमाणें सुव्यवस्था लागल्यावर पंतांच्या प्रतिभागंगेचा प्रवाह विशेष वेगानें वाहूं लागला, व या वेगाबरोबरच त्याचें पात्रहि रुंद व खोल होत चाललें. आपल्या काव्यकर्तृत्वाच्या चुंबकशक्तीनें त्यांनीं बारामतींतील व दूर प्रांतांतीलही रसिकांचीं मनें वेधून त्यांचा स्नेह, प्रसाद, व आशीर्वाद, संपादन केला, आणि जों जों अशा रसिक सज्जनांचा त्यांस प्रेमळ परिचय घडूं लागला, तों तों त्यांच्या भगवद्भक्तीला, साधुसंगलालसेला, व

काव्यप्रतिभेला, अधिकाधिक भरतें येऊं लागलें. यानंतर कांहीं काळानें जेव्हां कुटुंबविस्तार विशेष झाला, मातापितरांच्या वार्धक्यामुळें त्यांचा आधार निर्बळ झाला, व प्रपंचांतील निरनिराळे पेंच पडूं लागले, तेव्हां पंतांना शांतिसमाधानाचा व आत्मोद्धाराचा विलक्षण ध्यास लागून, त्यांची रसवन्ती आर्तरवानें भगवन्ताला व साधुसंतांना नानाप्रकारें आळवूं लागली. हरिदासांची व विठ्ठलभक्तांची वारंवार संगति होऊं लागल्यामुळें त्यांच्या नसानसांत नामभक्ति बाणून नाममाहात्म्याचे उद्गार त्यांच्या वाणींतून एकसारखे प्रसवूं लागले. अशा रीतीनें बारामतकरांचा आश्रय मिळाल्यापासून अखेरपर्यंत म्हणजे इ. स. १७६० ते १७९५ पर्यंत, पंतांची काव्यकृति दोन रंगांनीं रंगलेली आढळते. पंतांच्या विशाळ काव्यकान्ताराचा एक मोठा भाग पौराणिक रंगानें नटला आहे; तर दुसरा तुलनात्मक दृष्टीला लहान वाटणारा भाग त्यांच्या अन्तरंगाच्या तळमळीनें व आतुरतेनें फुलला आहे. पहिला बहिर्मुख आहे; तर दुसरा अन्तर्मुख आहे. पहिल्याचा रोंख सहृदय साहित्यभक्तांस मोहण्याचा आहे; तर दुसऱ्याचें ध्येय भगवंत व भागवत यांचा प्रसाद मिळविणें हा आहे. पहिला बहुशः प्रपंच नेटका करूं पाहतो; तर दुसरा प्रपंचापासून सुटण्याला धडपडतो. पहिल्याची समाप्ति पंतांच्या चौपन्नाव्या वर्षी, म्हणजे इ. स. १७८३ च्या सुमारास झाली, तर दुसऱ्याची व्याप्ति पंतांच्या देहावसानापर्यंत टिकली. पहिल्या भागांत पंतकृत पौराणिक आख्यानें, रामायणें, मंत्रभागवत, हरिवंश, बृहद्दशम व आर्याभारत, यांचा समावेश होतो; तर साधुसंतांच्या प्रशस्ति, देवतांचीं स्तोत्रें, करुणापूर्ण प्रार्थना, नाममाहात्म्य, सन्मनोरथराजि, संशयरत्नमाला, इत्यादि भक्तिप्रधान प्रकरणें, व केकावलीसारखे आर्तरवाचे टाहो, हीं दुसऱ्या भागांत मोडतात. पहिल्या भागांतील रसास्वाद लाभण्याला त्या त्या कथाप्रसंगाशीं सहृदय वाचकांचें तादात्म्य झालें म्हणजे पुरे होतें; परंतु पंतांची श्रद्धा, भक्तिभावना, आत्मोद्धाराची तळमळ, ईश्वरविषयक लडिवाळपणा, साधुसंतांविषयीं आदर, सगुणाबद्दल अढळ प्रेम, इत्यादि मनोगुणांशीं समरसत्व झाल्यावांचून दुसऱ्या भागांतील खरी रुचि प्रतीत होणें अशक्य आहे.

## काव्यरचनाकाळ.

पंतांच्या काव्यांचे रचनाकाळ कोठेंही प्रत्यक्ष नमूद केलेले नाहींत. तरीपण कांहीं कांहीं मुख्य काव्यांचे काळ जवळजवळ नक्की करण्याला थोडेंसें साधन आहे.

पंतांनीं ‘ प्रऱ्हादविजय ’ हें काव्य ‘ बहुधान्य ’ संवत्सरीं लिहिल्याचें त्यांनींच नमूद करून ठेविलें आहे. ‘ बहुधान्य ’ शा. श. १६८० सालीं येतो; आणि तें काव्य पौषमासांत संपूर्ण झाल्याचें उल्लेखित असल्यामुळें, प्रऱ्हादविजयाचा रचनाकाळ इ. स. १७५९ हा नक्की ठरतो. हें प्रकरण पंतांनीं विष्णुपुराणांतून उद्धृत केलें आहे. हें सबंध काव्य आर्यागीतिवृत्तांत रचिलें आहे. हें वृत्त साध्या गीतीपेक्षां जरा लांबट असल्यामुळें म्हणण्यास कांहींसें अवजड वाटतें, परंतु या वृत्तांत पंतांनीं भाषासुंदरीला कसें खेळविलें आहे, हें पाहिलें, म्हणजे त्यांच्या भाषाप्रभुत्वाविषयीं केवळ अचंबा वाटून वाचक थक्क होऊन जातो. हिरण्यकशिपु प्रऱ्हादावर क्रुद्ध झाला असतां, त्याचा पुरोहित त्याचा राग शांत करण्याच्या उद्देशानें म्हणतो—

**करुणाकंचुक तात**
**त्यजिति न, जरि लेंकुरें सदा चुकतात.**
**अनुकंपापात्रास**
**स्वसुतास असा दिजे न, भूपा, त्रास.**

असा यमकांचा, सुंदर कल्पनांचा, उपमादृष्टान्तांचा, भाषाप्रौढीचा, सुभाषितवचनांचा, व स्वभाववर्णनाचा, थाट सर्व काव्यभर सारखा साधला आहे. याच वृत्तांत पंतांनीं याशिवाय आर्यागीतिमुक्तामाला व कृष्णविजयाचे पहिले चौपन्न अध्याय रचिले आहेत. तेथेंहि भाषा, अर्थ, व रस, यांची धाटी हुबेहुब अशीच उतरली आहे. नमुन्याकरितां मुक्तामालेंतील तीनचार आर्यागीति येथें उद्धृत करितों. बरेचसे राक्षस एकत्र मिळून त्यांनीं कसाबसा मारुतीला पकडून त्याच्या पुच्छाला अग्नि लाविण्याचा प्रयत्न चालविला, तेव्हां—

**मारुतिलांगूळाला**
**लावुनियां अग्नि, वेष्टिती गूळाला**
**जेंवि पिपीलिक, सारे**
**पलाश म्हणती, ‘ पुढें उपाय कसा, रे ?**
**तों त्यांतून उसळला,**
**लंकाप्रासाद मंडळांत मिसळला !**
**अग्नीचा परम सण,**
**क्षणांत भासे पुरी भयंकर मसण !**

**रक्षोवधूमळवटीं**
**कोपुनि आणूनि शत्रु लावि मळवटी.**
**लंकेची मसणवटी**
**करूनि कपि रामचंद्रयश एकवटी.**
**लंका गमे हसन्ती,***
**देववधू चाविती जिभेसि हसन्ती.**
**धूम्या गगनीं श्रेणी**
**गमे दिवंगत पुरंध्रिची निःश्रेणी !+**

असो. याशिवाय हें वृत्त पंतांनीं इतरत्र कोठेंहि मोठ्या प्रमाणावर योजलेलें दिसत नाहीं. तेव्हां 'आर्यागीति' 'मुक्तामाला,' 'प्रल्हादविजय,' व निम्म्याहून अधिक 'कृष्णविजय,' हीं काव्यें पंतांनीं एकदमच अगर एकामागून एक ह्मणजे इ. स. १७६० च्या जरा आगेंमागें रचिलीं असलीं पाहिजेत, असें मानणें सयुक्तिक होईल. पंतांच्या इतर मुख्य मुख्य काव्यांचे अंदाजिक काळ ठरविण्यापूर्वी त्यांच्या कांहीं स्नेह्यांची, रसिक भक्तांची, व आप्तांची त्रोटक माहिती देणें अवश्य आहे.

## पंतांचे स्नेही व आप्त.

बारामतींत पंतांच्या काव्यांचे दोन रसिक भोक्ते होते, एक रघुनाथपंत कोशे व दुसरे पंतांचे शेजारी नारायणभट्ट. पैकीं कोशे हे स्वतः कवि होते. त्यांनीं लिहिलेलें पेशवे-प्रशस्तिकाव्य व दुसरे कांहीं चुटके अलीकडे उपलब्ध झाले आहेत. गोलवळीचे अनंत पाध्ये कोंकणांतील वृत्तीचा छेद झाल्यामुळें वैतागून पंढरपुर क्षेत्रीं येऊन इ. स. १७६० चे सुमारास कायमचे राहिले. हे मोठे विद्यासंपन्न, करारी, कर्मठ, व भगवद्भक्त होते. यांचा व मोरोपंतांचा स्नेहसंबंध जडला. अनन्त पाध्यांना पंतांच्या कवितेचा छंद जडला, व पंत पाध्यांच्या रसिकतेस व सत्वसंपन्नतेस मोहून गेले. पंत वारंवार पंढरपुरक्षेत्रीं जाऊन पाध्यांच्या विद्यानंदमय सहवासाचा लाभ करून घेत. नवीन काव्यग्रथन केल्याबरोबर त्याची प्रत पाहण्याकरितां पंत पाध्यांकडे मोठ्या आदरानें पाठवीत, व पाध्येहि पंतांच्या काव्यांचा मनापासून परामर्ष घेऊन त्यांचें कौतुक करीत व पंढरीच्या सुशिक्षित विद्याव्यासंगी भक्तमंडळींत त्यांचा फैलाव करीत. कालक्रमानें पाध्येपंतांच्या या जिव्हाळ्याच्या स्नेहसंबंधास आप्तपणाचें

---

* शेगडी. + निशीण, शिडी.

स्वरूप आलें. पाध्ये पंढरपुरास राहाण्यास आले, त्याच सुमारास पंतांचा दुसरा मुलगा ‘ रामकृष्ण ’ याचा जन्म झाला. या मुलास अनंत पाध्ये यांनीं आपली नात आऊताई दिली. हा सोयरेसंबंध जडल्यानंतर अनंत पाध्यांचें देहावसान इ. स. १७७४ त झालें. अनंत पाध्यांचे चिरंजीव व रामकृष्ण पराडकरांचे श्वशुर काशीनाथ बाबा पाध्ये हेही मोठे धर्मशास्त्रपारंगत, विद्वान्, व पंतकाव्याचे भोक्ते होते. पंतांपेक्षां हे जरी वयानें पुष्कळ लहान होते, तरी पंत त्यांच्या विद्वत्तागुणास्तव त्यांस समवयस्कासारखा आदरपूर्ण बहुमान देत. याच बाबा पाध्यांनीं ‘ **धर्मसिंधु** ’ नांवाचा धर्मशास्त्रावर ग्रंथ रचिला, व तो हिंदुसमाजांत आजमितीसही सर्वमान्य गणला जातो. रामकृष्ण पराडकर आपले सासरे बाबा पाध्ये यांच्या जवळच पंढरपुरीं अध्ययनासाठीं राहिले. प्रसिद्ध लावणीकार रामजोशी सोलापुरकर हे रामकृष्णाचे सहाध्यायी होते. असो. बाबा पाध्यांकडे पंत आपलीं काव्यें अखेरपर्यंत संशोधनाकरितां व वाचनाकरितां पाठवीत असत. पंतांचे दुसरे रसिक स्नेही विठोबादादा चातुर्मासे, अनवेकर*, हें होते. विठोबादादा हे एकनिष्ठ विठ्ठलभक्त होते, व त्यांची वाणी फार प्रेमळ व मोहक होती. त्यांचीं कीर्तनें अत्यन्त रसाळ होत व भजनप्रसंगीं ते भक्तिप्रेमानें केवळ देहभान विसरून जात. त्यांच्या वक्तृत्वांत व प्रासादिक भजनांत लहानथोरांच्या व स्त्रीपुरुषांच्या वृत्ति सारख्याच तल्लीन होत. यांच्याविषयीं पंतांचे उद्गार असे आहेत—

**निजजना अमृतें बहु तर्पिती,**
**स्व अनवें अनवेकर अर्पिती.**
**सतत पूर्ण मुकुंदयशोरसें**
**न वदना ‘ वद ना ’ म्हणती असें.**
**करिति विठ्ठलभक्त कथा बरी,**
**सुदृढ बाळहि जीस मनीं धरी.**
**वश जयासि सदा भगवान् हरी,**
**कुतुक या तुकयापरि भूवरी.**
**हरिजनोक्तिसमुल्लसनीं पटू**
**वचन जे वदती न कधीं कटू;**

---

* अनवें हा कसब्याचा गांव औरंगाबाद प्रान्तांत शिल्लोड तालुक्यांत आहे.

**त्यजिति, सेवुनि ज्या, अघ वासना,**
**बलवती लवती सदुपासना.**
**सुख तसें सकळांसहि वाटतें,**
**असुख सर्व पळांतचि आटतें,**
**निरखितांचि जसें भवपारदा**
**मुनिजना निजनायक नारदा.**
**वदति जीं वचनें परितोखदें,**
**भवतमाप्रति होतिच ओखदें.**
**निववुिले बहु वंदुनि मागती**
**भजन, ते जन तेथचि जागती.**

विठोबादादा व पंत यांचा नुसता स्नेह होता असें नाहीं, तर चांगलाच घरोबा होता. पंतांच्या आर्या विठोबादादा कीर्तनांत म्हणत असत, आणि पंत त्यांच्या अमृततुल्य मधुर व रसाळ वाणींत समरस होऊन जात. विठोबादादा चातुर्मासे व पंत यांचा थोडासा पत्रव्यवहार उपलब्ध झाला आहे, व त्यावरून आपल्या नव्या ग्रंथाच्या प्रति पंत विठोबादादा व काशीनाथ बाबा पाध्ये यांच्या एकत्र वाचनाकरितां पाठवीत असें समजतें. चातुर्मासे कधीं कधीं बारामतीस पंतांकडे येऊन राहात आणि पंत-ही बरेच वेळां त्यांच्या गांठीभेटीसाठीं पंढरपुरास जात असत. विठोबादादांचा काळ इ. स. १७९१त झाला. विठोबादादांचे चिरंजीव मैराळबुवा हेही बहाद्दर हरिकीर्तनकार होते, व त्यांची पंतकाव्यांवर मोठी मेधा बसलेली दिसते. पंतहि त्यांच्याबरोबर थोरपोराचा भेदभाव विसरून बरोबरीच्या नात्यानें आदरानें वागत. मैराळबुवांनीं बहुतेक सर्व पंतकाव्यांचा संग्रह आपलेजवळ केला होता, व त्यांच्या कीर्तनाची सर्व मदार पंतांच्या आर्यांवरच असे. हे पंढरीनाथाचे महाभक्त होते. पंत जेव्हां काशीयात्रेस गेले, तेव्हां मैराळ-बुवांनीं आपल्याबरोबर यावें म्हणून पंतांनीं आपली इच्छा प्रदर्शित केली. पण ' पंढरी हीच माझी वाराणसी ' अशासारखें कांहींतरी उत्तर मैराळबुवांनीं दिलें असावें, असें वाटतें, कारण, पंत गंगावकिलींत म्हणतातः—

**गंगे देवि ! विठोबादादा श्रीविष्णुभक्त शिवशील,**
**एतद्गीतहरियशःश्रवणें काशीसमेत निवशील.**
**याचा परम प्रेमळ नंदन मैराळ, तो तथापि कसा**
**येतो ? जो पंढरपुरचूतवनीं करितसे कथा पिकसा.**

मैराळबुवा इ. स. १८०४ सालीं कालवश झाले. पंतांचे दुसरे स्नेही व पंतकाव्याचे मोठे चहाते म्हटले म्हणजे ताऱ्हाबादकर संतचरित्रकार महीपतीबावांचे चिरंजीव विठोबाबुवा हे होत. हे पंतकाव्याचा संग्रह मोठ्या साक्षेपानें करीत व त्यांचा पंतांबरोबर पत्रव्यवहारही होत असे. विठोबा गोसाव्यांना गाण्याचें कसब होतें, व त्यांनीं एका पत्रांत पंतांना चालीचीं दोनचार पदें करण्याबद्दल विनंति केली आहे. पंतांनींही ही प्रेमळ विनंति तितक्याच प्रेमळपणानें मान्य केली असेल, यांत शंका नाहीं. पंत हेहि स्वतः कीर्तन करीत, परंतु त्यांस गाण्याचें विशेष अंग होतें, असें दिसत नाहीं. त्याच्या काव्यसंग्रहांत अभंग, दिंड्या, पदें, यांचा भरणा अगदींच अल्प आहे. अशा रचनेला कोमलपदलालित्य व भाषासुलभत्व विशेष लागत असतें. पंतांची वाणी स्वभावतः प्रौढ, गंभीर, व ठासर, असल्यामुळें तिचा चालीच्या पदाशीं संयोग चांगलासा श्रवणसुभग होत नाहीं. सोलापुरचे रामजोशी लावणीकार हेही पंतांच्या परिचयाचे होते, व हे आपल्या कीर्तनाच्या द्वारें पंतांच्या आर्यांचा प्रसार करण्यास बरेच कारण झाले. रामजोशी हे पंतांचा मुलगा रामकृष्ण याच्यापेक्षां दोनचार वर्षांनीं थोर होते ते रामकृष्णाबरोबर काशीनाथबावा पाध्ये यांच्याकडे पंढरपुरास अध्ययनास होते. परंतु रामजोशी जेवढे तैलबुद्धीचे होते, तेवढेच बेढंगी रंगेलहि होते. ते नीच लोकांच्या संगतीं लागून व्यसनी व फंदी बनले, व नाचेपोरे बरोबर घेऊन डफावर थाप मारीत शहरोंशहरीं फिरूं लागले. ललितकाव्यरचनेचें कौशल्य, पाणीदार चेहरा, रंगेल वृत्ति व मधुर कंठ, यांच्या जोरावर हे संभावित लावणीकार रामजोशी जिकडे जात, तिकडे लोकांस वेड लावीत ! अशी आख्यायिका आहे, कीं, एकदा रामजोशी पंढरपुरास आले असतांना, पंतही तेथें होते, आणि रामजोश्यांनीं गायलेली एक परमार्थपर सुंदर लावणी पंतांनीं ऐकून ते इतके संतुष्ट झाले, कीं, रामजोश्यांस आपल्याजवळ बोलावून व त्यांस बहुमान व धन्यवाद देऊन म्हणाले, ‘ जोशीबोवा, लोकांना विषयपंकांत रुतविण्यापेक्षां त्यांना परमार्थाच्या भक्तिमार्गास लावण्याकडे आपल्या अमृततुल्य वाणीचा तुम्हीं विनियोग केलात, तर तिचें किती बरें सार्थक होईल ! ’ हे शब्द रामजोश्यांच्या जिव्हाळीस झोंबले व त्यानीं डफ खालीं ठेवून विणा खांद्यावर घेतला, आणि तमाशाऐवजीं हरिकीर्तन करण्याचा सपाटा चालविला. त्यांच्या कीर्तनाचा भर मोरोपंती आर्यांवरच विशेषतः असे. आणखी एका प्रेमळ रसिकाचा उल्लेख करून, हा परि-

च्छेद आटोपता घेतों. बाबूजी नाईक हे पंतांचे आश्रयदाते खरे, परंतु त्यांनीं पंत-काव्याविषयीं कोणत्याही प्रकारें विशेष आतुरता दाखविल्याचें कोठें आढळत नाहीं. बाबूजींचा काळ इ. स. १७८० मध्यें झाला. त्यांच्या मागें बारामतीच्या व्यापाची व्यवस्था मुख्यतः त्यांचे द्वितीय चिरंजीव पांडुरंगराव यांच्याकडे आली. पांडुरंग-रावांना राघोबादादा पेशव्यांची मुलगी दुर्गाबाई ही दिली होती. हें लग्न इ. स. १७७३ सालीं झालें. त्या काळच्या सुखवस्तु घराण्यांतील मुलांच्या लग्नाची वयो-मर्यादा लक्ष्यांत घेतां, पांडुरंगरावांचें विवाहकालीं १२।१३ वर्षांचें वय असावें; म्हणजे पांडुरंगराव हे पंतांचे चिरंजीव रामकृष्णपंत यांच्याच वयाचे होते, हें उघड आहे. नाइकांच्या घराण्यांत खरी साहित्यलालसा व सहृदयता या तरुणाच्या ठिकाणीं वसत होती, असें दिसतें. पंतांनीं कांहीं काव्यग्रथनाचे प्रयत्न पांडुरंग-रावांच्या प्रेरणेनें केले आहेत. बाबूजींच्या मागें पांडुरंगरावांनींच मोरोपंतांचा यथा-स्थित परामर्श घेतला व त्यांस उणीव पडूं दिली नाहीं. पंत काशीयात्रेस निघाले त्या वेळीं पांडुरंगरावांनीं त्यांस उदार मनानें परवानगी दिली व यथोचित साह्यही केलें. पांडुरंगरावांना पंतांबरोबर गंगादर्शनास जाणें शक्य नव्हतें, पण सर्व बारामतकरां-तर्फें गंगामातेजवळ व विष्णुपदाजवळ वकीली करण्यास त्यांनीं पंतांना सांगितलें, व पंतांनींही ही प्रेमाची विनंति अत्यंत इमानेंइतबारें अमलांत आणली. पांडुरंगरावां-विषयीं पंतांचे उल्लेख अत्यन्त कृतज्ञतेचे, आदराचे, व प्रेमाचे, आहेत. ते आर्याभार-ताच्या उपसंहारांत सांगतात.—

**शीलजितामरचंदन तन्नंदन पांडुरंगरायाहि तें**
**यश मिरवितो, प्रजांचीं करि दशरथसा न राम काय हितें?**

गंगावकिलींत ते स्पष्ट म्हणतातः—

**श्रीबाबूरायाचा पुत्र पहा पांडुरंगराय कवी**
**देवि भगीरथनंदिनि! तात तसा स्वयश हाहि आयकवी.**

यावरून पांडुरंगरायांचें सुशीलत्व, सुस्वभाव, औदार्य, कर्तव्यदक्षता, व शहाण-पण, हे सद्गुण स्पष्ट होतात. असो, या परिच्छेदांतील माहितीवरून वाचकांच्या ध्यानांत येईलच, कीं, पंतांना आपल्या वरच्या, बरोबरच्या, व खालच्या, अशा तीन्ही पिढ्यांतील रसिकांनीं आपल्या काव्यरचनेचें केलेलें कौतुक अनुभवण्यास सांपडलें. त्यांच्याच हयातींत त्यांच्या आर्यांवर कीर्तन करणारे हरिदास अनेक

झाल्यामुळें २५।३० वर्षांतच या कीर्तनकारांच्या कामगिरीमुळें, त्यांच्या आर्यांनीं, रामचंद्र बडवे म्हणतात त्याप्रमाणें, काशीपासून रामेश्वरापर्यंत सर्व देश व्यापिला.

## पंतांच्या काव्यांचे कालनिर्णय.

प्रऱ्हादविजय हें काव्य पंतांनीं इ. स. १७५९ त रचिलें, हें पंतांच्याच रचनाकाळाच्या उल्लेखावरून सिद्ध आहे, हें मागें सांगितलेंच आहे. इतर कोणत्याही ग्रंथांत त्यांनीं कालनिर्देश केला नाहीं. परंतु कधीं कांहीं रचनाविशेषानें, कधीं प्रासंगिक उल्लेखांनीं, तर कधीं वरील परिच्छेदांतील रसिक स्नेह्यांपैकीं कांहींच्या नामनिर्देशांनीं त्यांच्या बऱ्याच मुख्यमुख्य काव्यांचे रचनाकाळ अंदाजानें ठरवितां येतात. आर्यागीतिमुक्तामाला—हें एक लहानसें रामायणच आहे—आणि कृष्णविजय हीं दोन काव्यें वृत्त व रचना यांतील सादृश्यावरून प्रऱ्हादविजयाबरोबरच एकदोन वर्षांच्या अंतरानें रचलीं असावींत असा अंदाज होतो. शिवाय ‘ दशम स्कंधाला ’ ‘ कृष्णविजय ’ हें नांवही ‘ प्रह्लादविजयाच्या ’ अनुकरणानेंच दिलें असावें. प्रऱ्हादविजय विष्णुपुराणांतून घेतला, कृष्णविजय भागवतांतून घेतला, आणि यानंतर पंतांनीं बाबूजींचा आश्रय मिळाल्यावर ‘ नरनारायणविजय ’ हा ग्रंथ भारताच्या कर्णपर्वाच्या आधारानें रचला. पंतांनीं या ‘ नरनारायणविजयग्रंथाच्या ’ अंतीं ‘ कर्णपर्व ’ समाप्त झालें, असें न म्हणतां * ग्रंथाचें स्वतंत्र नांव दिलें आहे, व आपल्या यजमानाचा नामोल्लेखही कृतज्ञतेनें केला आहे. बाबूजींचा उल्लेख—आर्या भारताचा उपसंहार वगळल्यास—पंतांनीं इतर कोणत्याही काव्यांत केलेला नाहीं. यावरून, बाबूजींचा आश्रय पंतांना या ‘ नरनारायणविजयाच्या ’ रचनाकाळीं नुकताच मिळाला होता, असें अनुमान होतें. तेव्हां प्रह्लादविजय इ. स. १७५९, कृष्णविजय इ. स. १७६२–३, व नरनारायणविजय इ. स. १७६४, अशा मानानें रचनाकालाचा अनुक्रम लागतो, व बाबूजी नायकांचा आश्रय पंतांना इ. स. १७६४ चे सुमारास मिळाला असावा असाही तर्क धांवतो.

---

* श्रीमत्सदाशिवात्मज बाबूजी नायक, प्रभु, ज्ञानी,
‘ धन्य ’ म्हणावें ज्याला शुद्धगुणश्रवणतृप्त सुज्ञांनीं,
त्या साधुसंगमुदिरें मुदित श्रीरामसुत मयूर कृती
‘ नरनारायणविजय ग्रंथ ’ करी व्हावया सुखी सुकृती.

पंतांचें एक स्फुट काव्य 'नामरसायन' या नांवानें प्रसिद्ध असलेलें आढळतें. परंतु या काव्यांत नाममाहात्म्य नसून मारुतीची याचना आहे; शिवाय, पंतांनीं या काव्याचें नांव नमूद केलें नाहीं, पण याच काव्यांत नामरसायननामक स्वतंत्र काव्याचा स्पष्ट उल्लेख केला आहे—

**तुमच्या पदप्रसादें सद्गुरुनें जें असेल पढवीलें,**
**तें, बा, तुह्मांस दाविन, 'नामरसायन' जपोनि कढवीलें. ११०**

तेव्हां या काव्यास विषयानुसार खुणेसाठीं आम्हीं 'हनुमदभ्यर्थना' असें नांव देतों. या काव्याचें महत्त्व हें आहे, कीं, यांत पंतांनीं स्वकृत बारा काव्यप्रबंधांचा स्पष्ट निर्देश केला आहे. तीं काव्यें अशीं–(१) नूतन लिहिलेल्या 'कृष्णकथा' म्ह० कृष्णाविजय, (२) मणिगणीं खचिला नगचि 'प्रल्हादविजय,' (३) सुधानदीसारखें 'कुशलवचरित' (४) मंत्ररामायण, (५) संशयरत्नावली, (६) सत्सत्कृति, (७) केकावलि (आर्याबद्ध), (८) नामसुधाचषक, (९) रामनामार्या, (१०) आर्या–(गीति)–मुक्तामाला, (११) जपोनि कढविलें 'नामरसायन,' व (१२) हनुमद्बाहुमहिमा. हें 'हनुमदभ्यर्थना' काव्य अनंत पाध्यांना दाखविलें आहे, असें पंत म्हणतात. अनंत पाध्ये इ. स. १७७४ मध्यें वारले. तेव्हां हें काव्य त्या सालापूर्वीं रचलें गेलें, हें स्पष्टच आहे. पण यांत 'कृष्णविजय' ग्रंथ नुकताच लिहिला आहे, व त्यापूर्वीं ह्मणजे इ. स. १७५९ सालीं 'प्रल्हादविजय' झालेला होता, हेंही असंदिग्धपणें नमूद आहे. म्हणून 'हनुमदभ्यर्थना' काव्य इ. स. १७६३ सालीं झालें असलें पाहिजे, असें फलित होतें; अर्थात् वरील सर्व तेरा काव्यें इ. स. १७६३ सालापूर्वींचीं म्हणजे पंतांच्या पस्तिशीच्या आधीं रचलेलीं आहेत, असें फलित होतें. या यादींत आर्याभारताचा, हरिवंशाचा, मंत्ररामायणाशिवाय इतर रामायणांचा, व भागवतांचा, उल्लेख नाहीं, त्याअर्थीं या सर्व काव्यांची रचना इ. स. १७६३ सालानंतर झाली, हें निश्चित ठरतें. या सालापूर्वींच पंतांच्या आर्यांचा फैलाव होऊन, त्यांचा रसिक विद्याभूषितांत जयजयकार होऊं लागला होता, आणि 'मीच सामान्य जनांना आर्येची ओळख करून दिली,'

अशा प्रकारचा सात्विक अभिमानही पंतांच्या अन्तरंगांत उद्भवला होता.+ वरील तेरा काव्यांपैकीं ' नामसुधा-चषक ' या काव्यांत पंत म्हणतात—

**प्रकटी प्रथम भगीरथ नृप लोकीं सुरनदी सती आर्या,**
**तसि हे मयूर, नाहीं तरि सर्वांला न दीसती आर्या. १११**
**उचित प्रचार भासो रसिकांस प्राकृतांत आर्यांचा,**
**युष्मद्वरेंचि होतो सत्कार प्राकृतांत आर्यांचा. ११२**
**आर्यासुधा बुधांनीं आकंठ प्राशिलीच धन्यांनीं**
**कानीं मात्र परिशिली होती, हो ! ती सती तदन्यांनीं. ११५**
**ते हे सुधा बुधांनीं मज लुब्धाला दिली सदा त्यांनीं,**
**केलों पात्र दयेला आधीं, मग मी किलीस, दात्यांनीं. ११६**

---

+ आर्येप्रमाणेंच दोहाछंदही मराठींत योजण्याची प्रथा आपणच प्रथम पाडिली असें पंत सांगतात. ते दोहाछंदांत गुंफलेल्या ' विठ्ठलस्तुतीच्या ' उपसंहारांत म्हणतातः—

**महाराष्ट्रभाषेंत ही दोहारीति नवीच,**
**रची मयूरेश्वर, इला मनीं धरील कवीच.**

पंतांची पुढील दोन पद्ये 'गज्जल' या विदेशी पद्धतीवर रचिलीं आहेत, असें अलीकडे प्रसिद्ध झालें आहे.

**हृदया ! बरें विचारीं, नाम स्मरें, न तापें. ध्रु०**
**भगवान् अजामिळाला नामें गजा मिळाला,**
**गणनातिगें गिळाला नामप्रताप पापें. १**
**ज्याचे मनांत थारे, गिळिले अराति सारे,**
**प्रभुच्या असे न बा रे ! केले रणांत चापें. २**
**नामींच भाव राहो, दुष्कर्मपंक वाहो,**
**सौख्या मयूर लाहो, जें मोजवे न मापें. ३**
**रसने ! न राघवाच्या थोडी यशांत गोडी. ध्रु०**
**निंदास्तुती जनाच्या, वार्ता वधूधनाच्या,**
**खोट्या व्यथा मनाच्या, कांहीं न यांत जोडी. १**
**साधूंचिया सदातें सुख देतसे सदा तें.**
**श्रवणीं सुधा, मदातें सोडूनि, हात जोडी. २**
**विनवी मयूर भावें, 'सखि ! हेंचि नित्य गावें,**
**मजला द्रवोनि पावें; दुसरें न बंध तोडी. ३**

' अहल्योद्धार ' या प्रकरणांत पंतांनीं घनाक्षरी वृत्तांत एक संस्कृत पद्य रचिलेलें आढळतें.

**साधुप्रसाद आर्यामृतरस रसिकां सख्यांसि दाखवितों,**
**राखवितों मर्यादाहि, यथामति मी बळेंचि चाखवितों. ११७**
**आर्यावृत्तक्षीरीं युष्मन्नुति शुद्ध शर्करा प्राज्य,**
**वरि ओतिलें यथेच्छ स्वच्छ श्रीरामनाम भन्याज. ११९**
**' भेटो रसिक लवहि जो ग्रंथीं चषकांत नूरवि, प्राशी, '**
**ऐसा वर दे, वरदेश्वर चरणा ! मज मयूरविप्राशी. १२०**

असो. पंतांनीं प्रऱ्हादविजयाला आर्यगीतिवृत्त घेतलें, व तेंच पुढें कृष्णविजयाला पहिल्या चौपन्न अध्यायांपर्यंत योजिलें, परंतु पुढें ऐशीं अध्यायांपर्यंत निरनिराळ्या वृत्तांत रचना करून, अखेरचे अकरा अध्याय साध्या आर्यावृत्तांत रचिले आहेत. साधारण वर वर पहाणारालाही *या अकरा अध्यायांची रचना जशी फार सुलभ, रेखींव, रसाळ, व मनोहर, उतरलेली आढळते, तशी ती त्या ग्रंथाच्या इतर अध्यायांत मुळींच आढळत नाहीं. आर्यागीति व अक्षरगणबद्ध वृत्तें यांतील रचना कांहींशी क्लिष्ट, कठोर, व दाठर, झाली आहे. पंतांच्याही लक्ष्यांत हा फरक आल्यावांचून राहिला नाहीं. म्हणून भारतांतून निवडलेल्या यापुढील ' नरनारायणविजयास ' त्यांनीं साध्या आर्यावृत्ताचा अंगीकार केला. या कर्णपर्वांतील नरनारायणविजयाचा काव्यपरिपाक फारच खमंग उतरला आहे, आणि तो तयार होतांच रसिकांनीं यथास्थित लुटून, कीर्तनकारांनीं सढळ हातांनीं श्रोतृवर्गास तत्काळ भरविला, असें दिसतें. या पर्वांतील युद्धप्रसंग, निरानिराळ्या पात्रांचीं प्रसंगोचित व स्वभावानुरूप संभाषणें, हंसकाकीयासारखीं खुबीदार कथानकें, व रचनेची रेखींव व डौलदार सरळता, या गुणसमुच्चयानें आर्याभारताची कल्पना उत्पन्न होण्यापूर्वींच पंतांचें कर्णपर्व जिकडेतिकडे गाजूं लागलें. या प्रत्यक्ष अनुभवानें आत्मविश्वासाचें बळ येऊन पंतांनीं आर्याभारत रचण्यास प्रारंभ केला, व त्यांत यथाक्रम नरनारायणविजयाची कर्णपर्वस्थानीं स्थापना केली. आदिपर्व पुरें झालें व तें मनाजोगें उतरलें असें पाहून पंतांस परम समाधान झालें. व " मंत्ररामायणप्रभृति ग्रंथ रचून वाल्मीकिप्रभृति प्रभुयशाच्या गायकगणांत सज्जनप्रसादानें या दुर्बळाचा पूर्वींच प्रवेश झाला होता; पण आश्चर्यांतील आश्चर्य हें, कीं, माझ्यासारख्या दीनाचा सहवास आज

* याच अध्यायांत सुभद्राहरण, रुक्मिणीस्वयंवर, लक्ष्मणाविवाह, वगैरे सुंदर प्रकरणें आलीं आहेत.

व्यास ऋषींनाही सहन करावा लागत आहे, ” असे उद्गार पंतांच्या तोंडून निघाले. ते आदिपर्वान्तीं लिहितात—

**ऐका, सज्जन हो ? भवद्धच खरें; आश्चर्य म्यां पाहिलें,**
**वाल्मीकिप्रभृति स्वबंदिनिकरीं दीना मला बाहिलें.**
**केलें प्राकृत काव्य ईश्वरपदीं धत्तूरसें वाहिलें,**
**सांगूं काय वरप्रसाद ? अजि तें व्यासेंहि कीं साहिलें !**

आर्याभारताची रचना चालू असतांना जसजशीं पर्वें अगर त्यांचे भाग तयार होत, तसतसे ते आपल्या रसिक स्नेह्यांच्या वाचनार्थ, परीक्षणार्थ, व प्रतीकरणार्थ, पंत पाठवीत असत. याविषयीं कांहीं थोडासा पंतांचा पत्रव्यवहार उपलब्ध झाला आहे, त्यांत एका पत्रांत कर्णपर्वाचा कांहीं भाग गहाळ झाल्याचा उल्लेख आहे. या पत्रांत पंत लिहितात—“ द्रोणपर्व आरंभापासून श्रीगुरुपुत्र सदाशिवोपाध्याय कऱ्हाडीं राहतात, त्यांजवळ आहे. उत्तरार्ध नवें लिहिलें तें येथें आहे. कर्णपर्व आपले जवळ अर्धें आहे असें लिहिलें. पुढील, देव दया करील, सांपडेल, असें अभय दिलें, यावरून निश्चिन्त झालों. ” या लहानशा उताऱ्यांतून तीन गोष्टी आपल्या पदरीं पडतात; ( १ ) पर्वांचे अर्धेमुर्धे भाग तयार झाले म्हणजे तेवढेच आपल्या स्नेह्यांकडे पंत पाठवीत, ( २ ) पंत जीं काव्यें स्नेह्यांकडे पाठवीत त्यांच्या स्थळप्रती त्यांच्याजवळ नेहमींच असत असें नाहीं, ( ३ ) द्रोणपर्वापूर्वीच कर्णपर्वाची रचना पुरी होऊन त्याची प्रत रसिक वाचकांकडे फिरत होती. आर्याभारताला आरंभ करण्यापूर्वी कर्णपर्व ‘ नरनारायणविजय ’ या नांवानें स्वतंत्र रचिलें होतें, या मताला ही एक पंतांच्या हातची लेखी पुष्टी आहे, कारण पर्वानुक्रमानें पाहतां द्रोणपर्व कर्णपर्वापूर्वीचें आहे, नंतरचें नाहीं. आर्याभारताची सुरुवात पंतांच्या छत्तिशीच्या सुमारास झाली, हें वर दाखविलेंच आहे. या आठरापर्व भारताची रचना पुरी होतां-होतां पंतांची पंचावन्निशी उलटून, त्यांस वृद्धापकाळाचीं लक्षणें चांगलींच भासूं लागलीं होतीं. विठोबादादांना लिहिलेल्या एका पत्रांत पंत म्हणतात, “ श्रीद्रोणपर्व श्रीगुरुपुत्रांकडील आलें नाहीं, आल्यावरी आपणाकडे येईल. शांतिपर्वे राजधर्मपर्व आरंभ झाला आहे. सांप्रत वर्षाकाळीं बुद्धीस आळस आला. राहिलें. खोकला झाला आहे आपणही चार दिवस धीर धरावा. वर्षाकाळीं असें बुद्धिमांद्य किंचित् येतें. वृद्धपणीं शक्त्युत्साह उणा पडतो. ” या पत्रावर आषाढ व. ९ रविवासर अशी मिति

असल्याचें समजतें. हा तिथिवारांचा योग शा. श. १७०३ म्हणजे इ. स. १७८१ त येतो. तेव्हां स्त्रीपर्वान्त आर्याभारताची रचना इ. स. १७८१ सालीं पुरी झाली होती, असें निर्णीत होतें. यानंतरच्या दुसऱ्या एका पत्रांत पंत विठोबादादांस लिहितात, " अलीकडे अश्वमेधमहाप्रस्थान दोन पर्वें लिहिलीं. स्वर्गारोहण लिहितोंहें; सिद्धीस पावविता आपला प्रसाद समर्थ आहे. " यावरून दादांच्या हयातींतच आर्याभारत समाप्त झालें, हें उघड आहे. दादांचा काळ इ. स. १७९१ त झाला, परंतु पंत काशीयात्रेसाठीं इ. स. १७८८ सालीं निघाले, ते इ. स. १७९३ त परत बारामतीस आले. तेव्हां आर्याभारताची समाप्ति इ. स. १७८१ ते १७८७ पर्यन्तच्या दरम्यान झाली, हें स्पष्ट ठरतें. हा निर्णय, पंतांनीं आपलें आर्याभारत काशीस नेलें, व काशीकर पंडितांनीं, त्याची शलाकापरीक्षा करून व योग्यता मान्य करून, मोठ्या आदरानें पालखींतून त्याची मिरवणूक काढिली, या दन्तकथेशीं सुसंगत आहे.

आर्याभारताच्या उपसंहारांत, बाबूजी नायकांच्या शौर्यधैर्यधार्मिकत्वादि गुणांचा उल्लेख करून,' त्यांच्या आश्रयानें माझा तनुनिर्वाह झाला,' असें कृतज्ञपणें सांगून, पंत म्हणतात,—

**शीलजिनामरचन्दन तन्नन्दन पांडुरंगरायहि तें**
**यश मिरवितो, प्रजांचीं करि दशरथसा न राम काय हितें ?**

म्हणजे " आजमितीस बाबूजींच्या मागें त्यांच्या इतक्याच सौजन्यानें व औदार्यानें माझा सांभाळ करून पांडुरंगराव नाईकही आपल्या वडिलांचेंच यश मिरवीत आहेत," असें पंत सांगतात. बाबूजी इ. स. १७८० मध्यें कैलासवासी झाले. तेव्हां शांतिपर्वापासूनची भारतरचना पंतांनीं पांडुरंगरावांच्या वहिवाटींत केली, असें ठरतें. शांतिपर्वापासून समाप्तीपर्यन्त आर्याभारताची ग्रंथसंख्या सुमारें अठ्ठावीसशें आहे. तेव्हां, याच काळांत आर्याभारताबरोबरच पांडुरंगरावांच्या सांगण्यावरून पंतांनीं हरिवंश लिहिला, व अष्टोत्तरशत रामायणें आणि संतचरित्रात्मक व भक्तिविषयक स्फुट प्रकरणें यांचीही रचना चालली होती, ही बाब लक्ष्यांत ठेविली, म्हणजे शांतिपर्वापासूनच्या आर्याभारताच्या रचनेस पंतांना तीनचार वर्षांचा अवधि लागला असेल, असें गृहीत धरण्यास कोणतीच हरकत नाहीं. एकंदरींत, सर्व बाजूंनीं विचार करितां पंतांच्या आर्याभारतरचनेचा काळ खालीं दर्शविल्याप्रमाणें मुकरर करितां येतो—

**नरनारायणविजय ग्रंथ अथवा कर्णपर्व—इ. स. १७६४**
**आदिपर्व-द्रोणपर्व, शल्यपर्व-स्त्रीपर्व—इ. स. १७८१ पर्यंत.**
**शांतिपर्व-भारतसमाप्ति—इ. स. १७८४ पर्यंत.**

आर्याभारताच्या रचनेला विशेषतः अनंत पाध्यांनीं प्रथमतः प्रेरणा केली, व, त्यांचा इ स. १७७४ मध्यें काळ झाल्यावर, विठोबादादा चातुर्मासे व काशीनाथ बाबा पाध्ये यांनीं या कामगिरीस चांगलें उत्तेजन दिलें, असें पंतांच्याच लेखावरून सिद्ध होतें. पंत आर्याभारताच्या उपसंहारांत म्हणतात—

**श्रीगीतेच्या एकादशसंख्याचा जसा उपाध्याय,**
**केवळ भक्तिरसमय श्रीमदनंताख्य जो उपाध्याय,**
**तो होय, शोभवुनि, या कवनानें साधु विप्र भासविता,**
**निज तेजें श्री देउनि पंकरुहा जेंवि विप्रभा सविता.**
**बहु शोभाप्रद झाला *श्रीविठ्ठल भक्तराय कवनातें**
**जेविं ऋतूंचा, करितां प्रकट गुण, वसंत नायक वनातें.**

चातुर्मास्यांस पाठविलेल्या पंतांच्या सर्व उपलब्ध पत्रांत काशीनाथ बाबा पाध्यांचा वारंवार उल्लेख आहे व त्यांनीं आपल्या काव्यांचें श्रवण व संशोधन करावें म्हणून पंतांनीं फार उत्सुकता दर्शविलेली आढळते.

काशीयात्रेहून परत आल्यानंतर म्हणजे इ. स. १७९३ सालाउपरी पंतानीं पृथ्वीवृत्तांतील प्रसिद्ध केकावलि रचिली, हें त्या काव्यांतील गंगादर्शनाच्या निर्देशावरून स्पष्टच होत आहे. कदाचित् प्रान्तप्रार्थना हें सतरा गीतींचें काव्य पंतांची अंतिम रचना असणें संभवनीय आहे. पंत इ. स. १७९४ च्या एप्रील महिन्यांत हनुमज्जन्माच्या शुभमुहूर्तावर अत्यंत स्वस्थ व समाहित चित्तानें रामरूप झाले. अशा प्रकारें या संसारी सत्पुरुषानें, तनुनिर्वाहापुरताच पण कर्तव्यदक्षतेनें प्रपंच करूनही, आपलें बुद्धिसर्वस्व व शक्तिसर्वस्व एकनिष्ठपणें काव्यग्रथनरूप भगवत्सेवेला सतत पंचेचाळीस वर्षें लावून, आपल्या जन्माचें सार्थक केलें.

## पंतचरित्रांतील कांहीं गोष्टी.

मोरोपंत बारामतीस इ. स. १७५३ सालीं येऊन वडिलांजवळ सुमारें एक तप राहिल्यावर त्यांस इ. स. १७६४ चे सुमारास बारामतकर नायकांचा प्रत्यक्ष आश्रय

---

* विठोबादादा.

मिळाला. हा आश्रय मिळण्यापूर्वीच त्यांनीं आर्या केकावलि नांवाचें एक रामयाचनेवर करुणाकाव्य रचिलें होतें, हें मागें दर्शविलेंच आहे. या काव्यांत पंतांच्या कुटुंबावर कांहीं तरी मोठें संकट त्या वेळच्या राजकारणामुळें आलें होतें, असें दिसतें. पंतांच्या वडिलांचे यजमान बाबूजी नाईक व श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्यामध्यें फारच स्पर्धा व शत्रुता होती. शाहूमहाराजांच्या मृत्यूनंतर आपल्यास प्रतिनिधिपद मिळावें म्हणून बाबूजी नाइकांनीं ताराबाईसाहेबांकडे मोठी खटपट चालविली. परंतु त्यांत त्यांस यश आलें नाहीं. दोन तीन ठिकाणीं लढाईचे प्रसंग उद्भवले, आणि त्या प्रसंगीं मार खाऊन व हार घेऊन अखेर इ. स. १७५७ त बाबूजी व त्यांचे कनिष्ठ बंधू आबाजी नाईक यांस बारामतीस येऊन स्वस्थ बसावें लागलें. बहुशः या राजकारणाच्या खटपटींत बाबूजी नाइकांच्या बारामतींतील आश्रितांसही जबर उपसर्ग पोंचला असला पाहिजे, व त्यासंबंधेंच आर्याकेकावलींतील पुढील उद्गार असावेतः—

कलिमार्जीं क्षुद्र नृप प्रजेसि देती धनार्थ बहु ताप,
पापप्रसक्त लोभी न पाहती धर्म, माय, कीं बाप.
खळ जे हे सत्पीडक, यांची तुज काय, राघवा, भीड ?
त्वद्दास तव समक्षचि गांजिति, येणें कशी न ये चीड ?
सिंहासमक्ष त्याच्या बाळाला जाचतील जरि कोल्हे,
तरि मग अशास 'पंचानन मृगपति' कोण जाणता बोल्हे ?
अपराधी सेवक तरि, दंडावा स्वामिनेंचि हें युक्त.
उक्त श्रवण करुनियां, करिं मजला संकटांतुनी मुक्त.
एकान्तीं त्वन्नामें गायिन मधुर स्वरें स्थिर स्वान्तें,
संकट वारुनि, द्यावें हें मज वरदान जानकीकान्तें.
या संकटाबरोबर वारीं लोकेषणादि अनिवार्य,
म्हणजे हा दास तुझा झाला लोकत्रयांत कृतकार्य.
तनुनिर्वाहापुरता संग धरुनिही अनर्थ मज घडला,
सावध तरी निसरड्या मार्गीं, विचकून दांत मुख, पडला
श्रीरामचंद्र ! राघव ! रघुवीर ! असेंचि आळवीन तुला,
संकट वारुनि, घडवीं माझ्या हातून या महाक्रतुला.

असो. या संकटाचें नकी स्वरूप काय होतें, हें जरी आज कळलें नाहीं, तरीं रामचन्द्रप्रभूनें त्याचें निवारण करून, पंतांच्या संकल्पाप्रमाणें त्यांच्या हातून वाङ्मय-द्वारा भगवद्भक्तीचा महायज्ञ सिद्धीस नेवविला, यांत मात्र शंका नाहीं !

पंतांना श्रीमंत बाबूजी नाइकांची पुराणिकी पस्तिशीच्या सुमारास लाभली. या वेळींही त्यांच्या कुटुंबांत त्यांचीं वृद्ध मातापितरें, स्वतःचें कुटुंब व दोनतीन मुलें, धाकटा भाऊ आबा, त्याची बायको, व एकाददुसरें मूल, पंतांची बहीण आका, एक दूरचा आप्त गंगाधर पराडकर, अशीं सुमारें बारा माणसें होतीं. शिवाय या कुटुंबांचा विस्तार सारखा वाढणाराच होता. तेव्हां श्री० नाइकांनीं मोरोपंत पुराणिकांस बारामतींत एक स्वतंत्र ७३ हात लांबीचा सरकारी वाडा ( घर ) राहण्यास दिला. यानंतर सुमारें एक तप पुराणिकाची कामगिरी केल्यावर इ. स. १७७७ सालीं पंतांना या घराचें श्रीमंतांकडून बक्षीसपत्र होऊन मिळालें.

पंतांचीं मातापितरें आर्याभारताच्या अनुशासनपर्वाची रचना होण्यापूर्वी नुकतींच दिवंगत झालीं असावींत, असें वाटतें, कारण त्या पर्वान्तीं अखेरच्या आर्येत मागील आर्येतील कल्पनेची पुनरुक्ति पत्करून आपल्या स्वर्गस्थ जननीजनकांचा उल्लेख पंतांनीं उद्देशून केला आहे. या दोन आर्या अशा आहेत—

**रामसुतमयूर म्हणे ज्ञात्यां रसिकांसि पसरुनी पदर,**
**" मी तुमच्या अमृत करें, गरुडें पावे न जेविं नीप दर. "**
**सज्जन मातें देवू संग, जसा गरुड दे कद्रूबातें,**
**देणें मीच न, गाइल बहु नाकीं मत्पिता मदंबा तें.**

अ० ८, ९९–१००

नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दींत पुण्यांत अभिमानी सोंवळेपणाला बराच ऊत आला होता, असें दिसतें. पेशव्यांच्या वाड्यांत अगर पेशवे हजर असतील तेथें हरिकीर्तनप्रसंगीं तुकारामी अभंग कथेंत म्हणूं नये, असा दण्डक पडला होता. याला कारण काय ? तर तुकारामाचे अभंग म्हणजे शूद्रकवन ! त्याचा विटाळ सोंवळ्या कीर्तनास नसावा ! या गोष्टीचा निषेध पंतांनीं आपल्या " तुकारामस्तुतींत " कोणताही आड पडदा न ठेवतां स्पष्ट वाणीनें केला आहे. ते म्हणतातः—

**शोभे कथा अभंगा पावुनिया, जेविं दीपका शाला.**
**सदभंग कथेंत नको, तरि मग शालेंत दीप काशाला ?**

**सुज्ञ शिवाजीराजा न म्हणे तुकयास काय ‘ साधु निका ’ ?**
**तत्पंडितप्रधाना न कळे गुण; समज फार आधुनिका !**
**भक्तिरसिक शूद्रकवन म्हणवूनि कशास नाक वाहेल ?**
**भगवत्पदप्रसादा बुध जेंवि तशास नाक वाहेल.**

पंतांच्या धार्मिक बुद्धींत विश्वबंधुता बाणली होती. देवापुढें, हा ब्राह्मण, हा शूद्र, हा हिंदु, हा अहिंदु, असा भेदभाव करितां येत नाहीं, असें ते म्हणत. देव जगज्जनक आहे, हे जीव लेंकरें आहेत. देवाच्या हातून उद्धार पावण्याचा त्या सर्वांस सारखाच हक्क आहे. पंत काशीस गेले तेव्हां गंगावकिलींत आपल्या आप्तेष्टमित्रांचा व वैभवशाली राष्ट्रीय स्त्रीपुरुषांचा उद्धार व्हावा इतकीच याचना करून ते थांबले नाहींत, तर मुसल्मान, इस्राएल, इत्यादि जे अहिंदू, त्या सर्वांचेंच तारण व्हावें म्हणून त्यांनीं गंगामातेस मोठ्या कळवळ्यानें गळ घातली आहे. आपल्या या कृत्यास कोणी अहंमन्य जन हंसतील, हें पंतांस माहीत होतें; म्हणून अशा अहंमन्यांनाही त्यांनीं तेथेंच रोकडा जबाब देऊन ठेविला आहे. ते गंगावकिलींत म्हणतात—

**गंगे, त्वां तारावे कुंभार, सुतार, परिट, लोहार,**
**नाहार म्हणायाचा जो, प्रभुचा होय, देवि, तो हार.**
**गंगे, सद्गति सर्वां हैबतरायादि बाबराला हो,**
**खळ हांसोत, मज भले म्हणतिल, “घेतोसि, बा, बरा लाहो.”**
**बारामतींत वसती जे, तारावेचि, देवि, तेलिहि ते,**
**जड जरि हेय, पुराणीं तरि कां हरिकीर्ति सेविते लिहिते ?**

पंत हे रामोपासक होते खरे, पण सर्वच दैवतें एकाच परमेश्वराचीं विभूतिमत् स्वरूपें आहेत, अशी त्यांची अद्वैत श्रद्धाबुद्धि जागी होती. एकाच सोन्याचे निरनिराळ्या प्रकारचे नग करितात. त्यांपैकीं एकादा नग एका इसमाला सुंदर घाटाचा वाटून त्यावर त्याचें विशेष प्रेम बसतें, पण दुसऱ्या इसमाला एकादा दुसऱ्याच तऱ्हेचा नग जास्त पसंत पडेल. परंतु आपल्या आवडत्या नगाशिवाय इतर सर्व नग भिकार अशी त्यांच्या अंतरंगांत भावना नसते, आणि सुवर्णदृष्टीनें तर ते सर्वच नगांची किंमत व योग्यता सारखीच समजतात. तद्वत् एकादें दैवत जरी आपलें आवडतें व उपास्य असलें, तरी इतर दैवतें त्याज्य मानण्याकडे आमच्या इतर साधुसंतांप्रमाणेंच पंतांचीही प्रवृत्ति नव्हती, आणि दैवतांदैवतांमध्यें भेदभाव करून

त्यांच्या सांप्रदायिक भक्तांनीं परस्परांबद्दल विषमबुद्धि धरावी, या गोष्टीचा त्यांनीं आपल्या ग्रंथांत अनेकवार निषेध केला आहे. शैव व वैष्णव यांचा अन्योन्याविषयींचा दुराग्रही दुर्ग्रह केवळ गर्हणीय होय असेंच पंत समजत. त्यांनीं बहुतेक सर्व देवतांवर स्तुतिपर स्फुट काव्यें रचिलीं आहेत, व त्यांच्याजवळ अत्यन्त श्रद्धाळूपणानें आत्मोद्धाराची याचना केली आहे. त्यांनीं भगवत्सेवा, रसिकसाधुसंगति, व आत्मोद्धार, यांवाचून दुसरी कसलीही लौकिक याचना केलेली आढळत नाहीं. आरंभापासूनच आत्मोद्धाराची तळमळ त्यांस लागलेली दिसते, आणि त्यांनीं आपलें सर्व काव्यग्रथन भगवत्सेवा म्हणूनच केलें आहे. आपलें सर्व सामर्थ्य, ज्ञान, पांडित्य, व कौशल्य, हीं या एकाच भावनेनें त्यांनीं आजन्म या कार्यीं वाहिलीं. रामोपासना त्यांच्या कुळांतच होती. नामभक्ति लहानपणापासूनच त्यांच्या अंगीं बाणलेली दिसते. त्यांना काव्यस्फूर्ति विशेषतः भगवत्सेवालालसेनें झाली, आणि यानंतर रसिक विठ्ठलभक्तांची संगति लाभल्यामुळें व भूवैकुंठपीठ पंढरींतील भाविक भक्तांच्या भोळ्या भक्तीचें वैभव त्यांनीं प्रत्यक्ष पाहिल्यामुळें, त्यांची वृत्तीही भागवतपंथांतील भक्तवीरांप्रमाणें नामसंकीर्तनांत व सगुणचरित्रगानांत तल्लीन होऊं लागली. पंतांचें काव्य बाह्यतः कितीही साहित्यभक्ताच्या पंडिती थाटाचें दिसलें, तरी त्यांतील आन्तर वृत्तीचे प्रवाह संतकवींच्या रसोदधीपासूनच उसळलेले आहेत. भगवन्ताप्रमाणेंच भागवतांजवळही पंत स्वोद्धाराची प्रार्थना चालवितात. त्यांनीं या प्रार्थनेंत सर्व तीर्थक्षेत्रींचे साधुसंत, ऐतिहासिक तसेच पौराणिक भगवद्भक्त, पतिव्रता स्त्रिया, भाविक संतकवि, या सर्वांचा उल्लेख केला आहे. ते ' महद्विज्ञापनेंत ' म्हणतात—

**जे पूर्वदक्षिणोत्तरपश्चिम देशांत, मध्य देशांत,**
**जे ऊर्ध्वाधोदेशीं, जे सुरदितिदनुजमानवेशांत, १३०**
**श्रीहरिहरभक्त, सकल तीर्थक्षेत्राचलस्थलवनांत**
**त्यांच्या, हा प्रणत तरो, ऐसें येऊ सकृत् तरि मनांत. १३१**

तसेंच ' पतिव्रताकीर्तनाच्या ' अन्तीं पंत प्रार्थना करितात.—

**श्रीभगवज्जन जो जो, जी जी त्याची महासती भार्या,**
**तीस नमस्कार असो, मजवरि ती बहु दया करो आर्या. ५०**

पंत हे घरंदाज, सभ्य, व निर्मळ वर्तनाचे, होते. स्त्रीजनांविषयीं त्यांना फार आदर होता. ते पुराणिक असल्यामुळें महिलाजनाशीं त्यांना फार परिचयाचा प्रसंग

येत असे, व स्त्रियांच्या स्वभावांतील आणि आचारांतील खुब्या त्यांच्या पूर्ण लक्ष्यांत आलेल्या होत्या, हें त्यांच्या काव्यांत वारंवार दिसून येतें. पण त्यांनीं त्यांची कोठेंही हेळणा केली नाहीं, किंवा उत्तान शृंगारवर्णनानें मर्यादातिक्रमही घडवून आणला नाहीं. लहान मुलांचें व मुलींचेंही पंत फार कौतुक करीत असत. मुलामुलींचे खेळ, त्यांचें लडिवाळ वर्तन, आईबापांनीं केलेलें मुलांचे कोड-कौतुक, वगैरेंचे सरस उल्लेख पंतांच्या सर्वच काव्यांत आढळतात. पंत विनोदाला पारखे नव्हते; परंतु त्यांच्या विनोदांतही गंभीरपणा आहे, छिचोर-पणा नाहीं. ' सन्मनोरथराजि, ' ' संशयरत्नमाला, ' इत्यादि स्फुट काव्यांत त्यांची विनोदरीति चांगली प्रत्ययास येते. वरील विवेचनाला समर्थक असे कांहीं दाखले येथें सादर करितों —

**पांचालिकाविवाहीं जैसें शिशुंनीं, तसें असो रुसणें;**
**समयीं आपन्नजनीं द्यावें, सुप्रिय जनीं जसें, उसणें. २०**
**प्रेमें नवीं नवीं तीं माझ्या रसनेसि सुकविकुलगीतें**
**गीतें यावीं, येती माहेरीं जेविं बहुत मुलगीतें. २२**
**साध्वीस्त्रीनें न टळो द्यावा हा सुमतिनें जसा पदर. २५**
**साध्वीला, जें कांहीं कान्तप्रिय, तेंचि कार्य होय जनीं. २९**
**लागाव्या गोड तशा मद्दृदया ज्या परें दिल्या गाळी,**
**बाळें देतां हर्षे, नसतां आठवुनि अश्रुतें गाळी. ३१**
**संसारदुःख विसरवु सत्पद्धति मतिस, जेंवि काय घडी**
**वरमायेसि विवाहीं विसरवि चवरी, गुलाल, पायघडी. ३६**
**मन्मति विनयादिगुणां वाहो प्रेमें, नगां जशी मुग्धा. ३८**
**प्रिय हरिजन हो जैसा आला माहेरचा बहायाला;**
**स्त्रीजन जसा विवाहा, जावें म्यां सज्जना पहायाला. ३९**
**हो नियति बहुमता मम मतिस, कुलवतीस जांसि सदा**
**श्वश्रू ४१**
**कीर्तन असो, मतिस बहुमत, जैसें स्त्रीस हळदकुंकु तरी. ४३**
**माणिकनकभूषणाहुनि सुबहुमता स्त्रीजना गळसरी ती. ३८**
**वरि संकोच असावा, आंत बहुत कृष्णकीर्तनीं काम,**
**गुरुजनसमक्ष पतिचें घेतां आर्याग्रहें जसें नाम. ५६**

कर्णयुगांत भरावें, जें हरिहरजनयश, प्रचुर म्यां तें,
जैसा दोंदी कोंदी गुर्जरदेशस्थ विप्र चुरम्यातें. ३
हा हो सुतृप्त राघवनामें सारेंचि जेंवि तेलिंगा;
शीला जपो बहु, जपति जैसे अय्यास्य साधु ते लिंगा. ४
स्त्रीस जसें न त्यजवे केलें उच्छिष्ट मांजरें दुभतें,
सद्गुजन दूषिलें जरि दुष्टें, मद्बुद्धि न त्यजू शुभ तें. ८
काव्य करावें म्यां न च, वचकावें दूषित्या परि लघूस,
कां न सदन बांधावें ? कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस. ९
मातेतें त्यजुनि पळहि जाय न भलतीकडे जसें बाळ,
सत्संगति सोडुनि मन न च जाउ, तसेंच घेउ हें आळ. ११
पूज्य असो मतिस तसा जन, जैसा जड अशक्त जामाता. १५
नच सोडावें नारायणनामानें कदापि हें वदन,
मेल्याही लोभ्याच्या चित्तें सोडूं नये जसें सदन, १७
बहु साधूक्त रुचावें, लोभी प्रभुला जसें चहाडाचें. ३३
निजदेहगेहभान प्रभुभक्तांच्या कधींहि मेळांत
मज कीर्तनीं नसावें, जैसें शिरतां मुलांस खेळांत. ३७
आवड असो कथेची, जसि बाळा फाल्गुनांत पुनवेची. ४७

सन्मनोरथराजि.

वाट अभ्यासि तसें लोळावें कविजना तुझ्या पुलिनीं;
क्रीडावें मुक्तींनीं माहेरीं जेंवि लाडक्या मुलिनीं. ३५
तुज परिपाल्यचि, गंगे, पापी कीं जो महातपा न्हातो;
शिशुचा काय खरजुला स्पर्शुनि नाणीत हात पान्हा तो ?५३

गंगास्तव.

बहुतकरुनि तों एका कन्येच्या या जगांत ज्या माता,
त्यांसि गमे स्वतनुपरिस अधिक सुतासूनुपरिस जामाता.

स्त्रीपर्व, अ० ५

पंत अशा प्रकारें कोमल वृत्तीचे, कनवाळू स्वभावाचे, शालीन वर्तनाचे, व रसिक अन्तःकरणाचे, होते. तरीपण ते शरीरप्रकृतीनें नेहमीं अशक्त असत. त्यांना बोलण्यासही थोडेंच हवें असे. त्यांची सहज प्रकृतीही जरा तापट असे, व हा तापटपणा जरी

ते आपल्या विवेकबळानें आळ्यांत आणीत, तरी वाढत्या गरिबीच्या प्रपंचांतील वाढत्या गुंत्यांमुळें व पेंचामुळें तो त्यांच्या कुटुंबाच्या अनुभवास येत असे. परंतु रमाबाई फार भल्या, कर्तव्यदक्ष, व पतिपरायण होत्या. त्यांनीं पतीचा तापटपणा सहन करून प्रपंचाचा व्याप यथास्थितपणें चालविला. याच साध्वीच्या प्रोत्साहनानें पंत पुढें इ. स. १७८८ सालीं काशीयात्रेस निघाले. पंतांनीं ही गोष्ट आपल्या ' विष्णुपदवकिलींत ' अगदीं मोकळ्या मनानें कथन केली आहे. ते म्हणतात,—

**मी जरि अशक्त, निर्धन, कोपी, तरि बहुभली रमा भार्या;**
**ईतें सद्‌गति दे तूं, हेचि करी प्रथम बोध या कार्या. ६९**

बाबूजी नायकांचें घराणें व पेशवे घराणें यांच्यामध्यें नानासाहेब पेशव्यांच्या अमदानींत तीव्र वांधा उत्पन्न झाला.या लढ्यांत व स्पर्धेत नायकांच्या पदरीं अखेर अपेशच आलें. पहिल्या माधवरावांच्या अमदानींतही नायकांनीं श्रीमंत राघोबादादांचा पक्ष घेतल्यामुळें नायकांना थोडेबहुत जाच व क्लेश सहन करावे लागले. परंतु नारायणरावांच्या वधानंतर जेव्हां राघोबादादांचा पक्ष अखेर नामोहरम झाला, व सर्वत्र बाह्यतः तरी स्थिरस्थावर होऊन सवाई माधवरावांचे दिवाण म्हणून नाना फडणिसांच्या मंत्रानें राज्ययंत्र सुतंत्र चालूं लागलें, तेव्हां नायकांच्या घराण्याचें मन बरेंच निवळून तें पेशवेसरकारास अनुकूल झालें. परंतु " आम्ही सातारच्या गादीचे सेवक आहों, पुण्याच्या पेशवाईचे नाहीं, " अशा तऱ्हेची बुद्धिभेद करणारी भावना कांही ब्राह्मणेतर राजकारणी अग्रेसरांच्या अन्तःकरणांत धुमसूं लागली, व या भावनेचे स्वाभाविक परिणाम थोड्याच दिवसांनीं मराठी साम्राज्यास भोगावे लागले. असो. पेशव्यांविरुद्ध अशा प्रकारची भावना त्या वेळीं ब्राह्मणसमाजांत फारशी प्रसृत झालेली आढळत नाहीं. सामान्यतः नानाफडणिसांच्या शहाणपणाचा आब या समाजांत फार होता, आणि सवाईमाधवराव हे प्रत्यक्ष परमेश्वरकृपेनें अवतरलेले प्रजापालनशील वैभवशाली प्रभु आहेत, अशी बहुजनसमाजाची समजूत होती. पंतांचीही हीच समजूत होती, व नानासाहेबांच्या कालापासून पेशव्यांच्या वाड्यांत तुकारामी अभंगावर कीर्तनप्रसंगीं बहिष्कार घातल्याबद्दल ' पंडितप्रधानांच्या ' समजूतदारपणाची धिंड ज्या पंतांनीं काढली आहे, तेच पंत सवाईमाधवरावांच्या कारकीर्दींत " राजाप्रमाणेंच त्याच्या पंडितप्रधानांनाही बहुमान देऊन त्यांच्याशीं निष्ठेनें वागलें पाहिजे, " असा उपदेश करितांना आढळतात. ' सन्मनोरथराजि ' हें प्रकरण पंतांनीं इ. स. १७७४ नंतर केव्हांतरी रचलेलें आहे. या ' राजींतील ' पहिलाच ' मनोरथ ' असा आहे,—

**श्रीरामासि भजावें भक्तें म्यां जेविं, तेविं संतांतें,**
**राजासि उपासावें, तैसेंचि जनें प्रधान पंतांतें.**

‘ नामार्या ’ प्रकरणांत पंतांनीं ‘ भगवन्ताला ’ राजा कल्पून ‘ नामाला ’ त्याचा पंतप्रधान किंवा प्रतिनिधि मानिलें आहे; व या पंतप्रधानानें राजाला आपल्या कह्यांत आणून त्याचा अधिकार बळकाविला आहे, “ तेव्हां आतां हात चालत आहे तोंपर्यंत आपले आश्रित जे नामभक्त त्यांची भराभर सोय लावून द्या, ” अशी प्रार्थना करून पर्यायानें नानासाहेब पेशव्यांच्या राजकारणावर किंचित् ताशेरा झाडला आहे, असें वाटतें. ‘ नामार्याचा ’ उल्लेख ‘ हनुमदभ्यर्थेंत ’ आलेला आहे, हें मागें एका परिच्छेदांत सांगितलेंच आहे व त्याची रचना इ. स. १७७४ पूर्वी झाली असली पाहिजे, हें उघड आहे. परंतु पंत प्रधानांसंबंधींच्या या उल्लेखावरून तें काव्य पंतांनीं इ. स. १७६१ च्या पूर्वी नाना साहेबांच्या कारकीर्दींत लिहिलें असावें, असेंही आतां स्पष्ट सिद्ध होतें ‘नामार्यांत’ पंत लिहितात—

**नित्य महाराज तुम्ही स्वामी, नाम प्रधान पंत अर्जी,**
**सोडवितां जलधींत ग्राहग्रस्ता गजासमेत गजी.**
**स्वामी ! नारदबावा परम प्रिय त्या तुम्ही, तुम्हां तोही,**
**कलहैकप्रतिपादक, फलसूचक, शास्त्रपटु, न कां मोही ? १००**
**भलत्यांच्या कर्माशीं स्वप्रभुशीं लाविसी कलह सद्या,**
**तेणें तुज, कीं त्वां त्या, न कळे चट लाविली सम नवद्या. १०१**
**त्रिभुवन राज्य प्रभुचें प्रतिनिधिनें त्वां स्वहस्तगत केलें,**
**भोळ्या दिगंबराचें आक्रमिलें वतन, जळ जसें तेलें. १०२**
**वसवुनि निजगुरु राजा, निजगुरुगुरुचेंहि राज्य आक्रमिलें,**
**एवं कलहविनोदें हा काळ बरें तुम्ही सदा क्रमिलें. १०३**
**नामा ! तूं प्रबळ खरें, तुज वाटावें बरें, अशा भावें**
**लुडबुड करी भवत्प्रियसख सदनीं, तें कितिक सांगावें ?**
**या काळांत भरभर, स्वामी ! तूंझीच, कीं धणी हातीं !**
**घेसी आश्रितकामें एकामें करुनि, न लवतां पातीं १०३**

परंतु यानंतर सवाई माधवरावांच्या कारकीर्दींत मराठी राज्याचें जतन करण्यास पेशव्यांशिवाय कोणी समर्थ नाहीं, हें जाणून पंतांनीं आपल्या ‘ मनोरथराजींत ’ “ राजाप्रमाणेंच पंतप्रधानांना लोकांनीं उपासावें, ” असा मनोरथ व्यक्त केला

आहे, हें पूर्वीं नमूद करण्यांत आलेंच आहे. यावर इ. स. १७९०–१ सालीं काशींत असतांना आपल्या ‘ गंगावकिलींत ’ पंत ‘ श्रीविष्णुस्वामिभक्त ’ नाना फडणिसांची, ‘ प्रभुप्रतापशाली ’ हरिपंत तात्या फडक्यांची, व रास्त्यांची, वकिली करून, गंगेस विनवितात.—

**यावे, द्युनदि ! खळांतें श्रीमाधवराय पेशवे दमुनी,**
**व्हावे, श्रीरामजयें हृष्ट जसे, सर्व देश, वेद, मुनी. ८९**

बाजीराव रघुनाथ पेशवे यांचा जन्म इ. स. १७७४ सालीं झाला. याच्या आधल्याच वर्षीं त्यांची मोठी बहीण दुर्गाबाई हिचा विवाह पांडुरंगराव बाबूजी नाईक यांच्याशीं झाला. बाबूजी नाईक इ. स. १७८० त वारल्यावर पंत पांडुरंगरावांच्या आश्रयास होते. असो. एकदा बाजीरावसाहेब भाऊबिजेकरितां बारामतीस आले. तेव्हां पांडुरंगरावांनीं बाजीरावसाहेबांजवळ पंतांच्या अलौकिक गुणांची प्रशंसा केली. बाजीरावही विद्येचे शोकी होते. त्यांचें वेदाध्ययन चांगलें झालें असून, संस्कृत काव्योपवनांतही त्यांचा विहार चालू होता. त्यांच्या अंगीं रसिकताही कांहीं कमी नव्हती. पुढें पेशवे झाल्यावर त्यांनीं कसेही गुण पाघळले असले, तरी त्यांना विद्याव्यसन होतें आणि काव्यमर्म जाणण्याची त्यांना शक्ति होती, यांत शंका नाहीं. तेव्हां किंचित् बहुमानानें व बऱ्याचशा कुऱ्यानें, त्यांनीं पंतांना म्हटलें, कीं, “ तुम्ही आमच्या आश्रयाला येऊन राहा, तुम्हांला चांगलें वेतन देऊं. ” यावर पंतांनींही गंभीरपणानें उत्तर केलें, “ आमच्या यजमानांस आमचा कंटाळा येऊन त्यांनीं ‘ जा ’ म्हटल्यास ईश्वर वाट दाखवील तिकडे जाऊं ! ” या उत्तरांतील मख्खी बाजीरावांसारख्या चाणाक्ष माणसाच्या लक्ष्यांत आल्यावांचून राहणें शक्यच नव्हतें; आणि, पुढें पेशवे झाल्यावर, म्हणजे पंतांच्या देहावसानानंतर, ‘ मोरोपंतांची आर्या कीर्तनांत म्हणूं नये, ’ असा पेशव्यांच्या वाड्यांत दण्डक घालून, बाजिरावांनीं वरील गोष्टीचा सूड घेतला ! असो. वरील प्रकारचा प्रसंग घडून येण्याला बाजिराव साहेबांचें वय निदान १४।१५ वर्षांचें तरी असलें पाहिजे, हें उघड आहे. पंत शा. श. १७१० च्या कार्तिक मासीं काशीयात्रेस निघाले. शा. श. १७१० म्हणजे इ. स. १७८८ या सालीं बाजीराव साहेब १४।१५ वर्षांचे होते. तेव्हां वरील प्रसंग त्या वर्षाच्या आश्विनमासांत घडला असला पाहिजे हें क्रमप्राप्तच ठरतें.

पंत जबर उद्योगी व व्यासंगी होते. ते जरी अशक्त होते, तरी लेखन, वाचन, व काव्यग्रथन, या तीन कामांत तो अशक्तपणा फारसा प्रकट झालेला आढळत नाहीं. चाळिशीच्या अमदानींतील त्यांचा विद्याव्यासंग साठींतही तसाच आढळतो. पंतांच्या हातचे, स्वतःच्या काव्यग्रंथांशिवाय, जवळजवळ पन्नास लहान मोठे संस्कृत प्राकृत ग्रंथ आजमितीस त्यांच्या दप्तरीं हयात आहेत. त्यांत 'मालविकाग्निमित्र' हा ग्रंथ आपल्या वयाच्या ४९ व्या वर्षी व 'अपरोक्षानुभूति' हा ग्रंथ ५२ व्या वर्षी लिहिल्याबद्दल स्पष्ट निर्देश आहे. त्यांची भक्तिप्रधान काव्याची आसक्ति वयोमानाप्रमाणें सारखी वाढतच चालली होती. म्हातारपणाची लक्षणें जाणवूं लागल्यावर सुद्धां ' बिहारी ' भाषा शिकून तिच्यांतील भक्तिरसाचा सांठा लुटावा, अशी त्यांना उत्कंठा लागून राहिली होती. ते ' रामरीतींत ' म्हणतात—

**सद्व्यसनीं वेंचावें आयुष्य नसेचि भरंवसा याचा,**
**झालों जीर्ण, तरि मनीं आहे रसिकांत भर वसायाचा ६७**
**त्वत्प्रीत्यर्थ तव सुगुणमयाचि करुनि कवन, वेंचितों देहा;**
**उत्साह त्वत्कीर्तनरस चित्ता नवनवेचि तों दे हा ६८**
**समजुनि घ्यावी वळवुनि सेवेनें सुरसिका बिहारी ती,**
**म्हणतो अद्यापि तसी वेडा भूसुर शिकावि हा रीती ! ६९**
**श्रीरामा ! बहुगोडचि मजला जैसें दुकाळल्या सर्व;**
**कोठें मिळतें ? कैंची शक्ति ? धरिन मी मनांत कां गर्व ? ७०**

पंत इ. स. १७८८ सालीं काशीयात्रेस गेले. परंतु त्यापूर्वी बरेच दिवस या यात्रेचा त्यांना ध्यास लागला होता. हा ध्यास लागला असतांनाच त्यांना एका मित्राच्या संगतीनें राजापुरच्या गंगेचें दर्शन व स्नान घडलें. त्या प्रसंगीं राजापुरगंगेवर त्यांनीं एक माहात्म्यकाव्य लिहिलें आहे. त्यांत "त्या काशीवाहिनी पावनश्रेष्ठ भागीरथीचा ध्यास घेण्यांत मला या जवळच्या तिच्या प्रतिनिधीचा विसर कसा पडला, कोण जाणे ! ' असे उद्गार पंतांनीं काढले आहेत. ते म्हणतात—

**येत्ये अद्यापि श्रीगंगा राजापुराचिया जवळ,**
**कोंकण करि ती, विखरुनि शुद्धयशश्चंद्रचंद्रिका, धवळ. १७**
**मज एक वेळ घडलें सत्संगतिनें अलभ्य मज्जन, हो !**
**रचिलें सुतीर्थकीर्तन, हें फळ त्याचेंचि होय, सज्जन हो ! १८**

**या तीर्थकीर्तनाचा पडला, त्या तीर्थकीर्तनें विसर,**
**नग लेवुनि, विसरावा मुक्तांचा सगुणपूर्ण जेंवि सर. १९**
**गंगा म्हणे, " अहा ! या माझी कैशी सुकीर्ति धवळील ?**
**मद्रूप विसरला, जें केवळ कारुण्य मूर्त जवळील. " २०**
**गंगेला जायाला, मज हतभाग्या, न शक्ति, न उपाय,**
**स्तुति सूचविली, प्रभुचे, देति प्रणतासि भक्ति नउ, पाय. २५**

यांतील १९ व्या आर्येंत " काशीस्थ गंगेच्या कीर्तनाच्या भरांत या राजापुरस्थ गंगेचें कीर्तन मी विसरलों होतों, " असें पंत सांगतात; आणि तें अगदीं खरें आहे, कारण पंतांची पत्नी रमाबाई हिनें त्यांच्या मनांत गंगादर्शनाची इच्छा जागी केल्यावर पंतांना विलक्षण उत्सुकता लागली, पण ती पुरी होण्याचा योगायोग तर कांहीं दिसेना, तेव्हां त्यांनीं गंगाविज्ञप्ति ( संस्कृत ) व गंगाप्रार्थना ( प्राकृत ) अशीं दोन काव्यें कोणा यात्रेकरूबरोबर गंगेला अर्पण करण्यास पाठविलीं होतीं. पहिल्या काव्यांत त्यांनीं गंगेला विनविलें आहे कीं, " माझ्या या प्रार्थनेला मान दे, व मला तूं आपल्याजवळ ने, आणि मुक्ति दे. "

**शरणागतस्य मम खलु तव चापि यशस्करीमिमांमुक्तिम् ।**
**मानय, मा नय निकटं, परिपालय, देहि वत्सले ! मुक्तिम्. २१**

गंगाप्रार्थनेंत ' ते अखेर स्पष्टच लिहितात—

**श्रीरामसुतमयूरें श्रीगंगाप्रार्थनार्थ या आर्या**
**पाठविल्या काशीप्रति, कीं दीनाच्या जपेचि ती कार्या. १७**

असो. हीं पत्रें गंगेला पाठवल्यावर राजापुरस्थ गंगादर्शनाचा योग जुळून आला. तेव्हां पंतांनीं समाधान मानून घेतलें, कीं, " काशीस्थ गंगेला जाण्याला मला शक्ति नाहीं, साधन नाहीं. मी हतभागी आहें. पण श्रीगंगेनें माझ्या प्रार्थनापत्रास मान देऊनच हा राजापुरस्थ प्रतिनिधिदर्शनाचा योग आणून या तीर्थकीर्तनसेवेला मला पात्र केलें. " परंतु यानंतर लौकरच म्हणजे इ. स. १७८८ सालीं काशीयात्रेचा चिरवांछित योग पंतांना साधला. पांडुरंगराव नाईकांनीं त्यांना मोठ्या संतोषानें जाण्यास अनुज्ञा दिली, पंतांचे धाकटे बंधु आबा यांनीं सर्व तयारी केली, आणि धनाजी जाधवाचे नातू अमरसिंह जाधव मालेगांवकर यांनीं त्यांस सर्व मंडळीसह जपून नेण्याची जबाबदारी आपल्यावर घेतली. पंतांबरोबर त्यांचे वडील बंधू सोनोपंत,

पत्नी रमाबाई, व धाकटा मुलगा दादा, इतकी प्रत्यक्ष घरची मंडळी होती. इ. स. १७८९ त मे महिन्याच्या सुमारास सर्व मंडळी गयेस पोंचली. पुढें गयेहून काशीस येतांना पंतांचा मुलगा दादा याचा देहान्त झाला. पंत गंगावकिलींत म्हणतात—

**जो सज्जनरंजन सुत दादा मार्गांत पावला मरण,**
**स्मरण धरूनि करावें, गंगे, त्वां तद्भवव्यथाहरण.**

त्याच वर्षी आषाढमासीं पंत काशीस आले व तेथें त्यांनीं चातुर्मास घालविला. याच समयीं काशीस्थ पंडितांनीं आर्याभारताची शलाकापरीक्षा केली व त्याचा बहुमान केला. यात्रेहून परत येतांना पंतांनीं चोळीमहेश्वर येथें अहल्याबाई होळकरणीची गांठ घेतली. बाई मोठी कर्तबगार, उदार, धार्मिक, व न्यायी, म्हणून सर्वत्र गाजलेली होती, व पंतांच्या मनांत तिच्याबद्दल फारच आदरभाव होता. या भेटीपूर्वीच त्यांनीं " गंगावकिलींत " बाईचा उल्लेख केला होता, तो असा—

**देवि ! अहल्याबाई यावी भेटावयासि सत्वर ती,**
**तूं पुण्यकीर्ति हेही, गंगे ! दोघीजणीहि सत्वरती. ९०**

बाईनें पंतांचा मोठाच मान केला व त्यांस बरेच दिवस ठेवून घेतलें. ' आमच्याच आश्रयास रहा, ' म्हणून पंतांना बाईकडून पुष्कळ आग्रह झाला, परंतु पंत बारामतकरांचा आश्रय व उपकार विसरले नाहींत.

असो. अशा रीतीनें ठिकठिकाणीं बहुमान घेत, पंत इ. स. १७९३ सालीं परत आले. व यानंतर सुप्रसिद्ध पृथ्वीवृत्तांतील श्लोककेकावलिरूपानें आर्तस्वराचे उद्गार काढून ते इ. स. १७९४ मध्यें हनुमज्जयन्तीच्या पुण्य मुहूर्तावर रामस्वरूप झाले.

**बा. अ. भिडे.**



श्री राम

# सुबोध केकावलि.



( केका म्हणजे मोराचा टाहो. पावसाळ्याच्या आरंभीं काळे ढग यावयास लागले, कीं, मोर पावसाकरितां उतावीळ होऊन मोठ्यानें टाहो फोडूं लागतात. या मोरांच्या ओरडण्याला संस्कृतांत 'केका' म्हणतात. आवलि म्हणजे माला, सांखळी, रांग. प्रस्तुतच्या काव्यांत मोरोपंतांनीं ईश्वरप्रसादाविषयीं उतावीळ होऊन, पर्जन्योत्सुक मोराप्रमाणेंच, एकामागून एक श्लोकरूपानें तळमळीचे उद्गार काढले असल्यामुळें, याला 'केकावलि' हें नांव दिलें आहे. या नांवांत कवीनें आपल्याला मोराच्या ठिकाणीं समजून, दयामय ईश्वराला पाण्यानें ओथंबलेल्या मेघाप्रमाणें मानिलें आहे.

या काव्यांतील श्लोकांच्या वृत्तास 'पृथ्वी' असें छंदःशास्त्रांतील नांव आहे. प्रत्येक श्लोकाचे चार विभाग करितात, व त्यांना 'चरण' म्हणतात. हे सर्व चरण रचनेनें तंतोतंत सारखे असले, म्हणजे त्या वृत्तास 'समवृत्त' ही संज्ञा देतात. वृत्ताचें लक्षण ठरवितांना प्रत्येक चरणाचे, तीनतीन स्वरोच्चाराचा एक, असे विभाग पाडतात. त्यांना 'गण' म्हणतात. दीर्घ स्वरोच्चाराला 'गुरु' व ऱ्हस्व स्वरोच्चाराला 'लघु' म्हणतात. पुढें संयुक्त व्यंजन आलें असतां, मागील ऱ्हस्व स्वरालाही हिसका बसून तो गुरु होतो. आतां, प्रत्येक गणांत तीन स्वरोच्चार असल्यामुळें त्यांचे गुरुलघु उच्चारांच्या मांडणीप्रमाणें आठ भेद संभवतात. या आठ गणांना य-गण, न-गण, इत्यादि नांवें सोईसाठीं दिलीं आहेत. या गणभेदांचीं लक्षणें दाखविणारे शब्द पुढील कारिकेंत आहेत. हींत प्रत्येक शब्दाच्या पहिल्या अक्षरानें त्या त्या गणाचें नांवही दाखवावें, अशी योजना आहे.

**य–यमाचा, न–नमन, त–ताराप, र–राधिका, ।**
**म–मानावा, स–समरा, ज–जनास, भ–भास्कर. ॥**

या गणांचीं लक्षणें स्वरांच्या मांडणीप्रमाणें अनुक्रमें अशीं सांगतां येतात–आद्यलघु, सर्वलघु, अन्त्यलघु, मध्यलघु, सर्वगुरु, अन्त्यगुरु, मध्यगुरु, व आद्यगुरु. गुरुलघु स्वरोच्चार –,‿, या खुणांनीं दाखविण्याचा प्रचार आहे. या पद्धतीनें श्लोकाच्या

चरणाची गणविभागणी केल्यावर, एक अगर दोन अक्षरें बाकी राहिल्यास, तीं स्वतंत्र गणण्यांत येतात. आतां या सर्व नियमानुसार केकावलींतील पहिल्या श्लोकाच्या पहिल्या चरणाची फोड करून पृथ्वीवृत्ताचें लक्षण ठरवूं.

**सदाश्रि-| तपदा | सदाशि-| वमनो-| विनोदा-| स्प | दा |**

⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – – ल. गु.

ज स ज स य ल. गु.

म्हणजे, पृथ्वीवृत्ताच्या चरणांत एकंदर सतरा स्वरोच्चार येतात, व 'जसजसय' अशी गणांची परंपरा असून अंतीं लघुगुरू असे दोन स्वरोच्चार असतात. चारी चरण सारख्याच घटनेचे असल्यामुळें हें ' समवृत्त ' ही आहे.

वृत्ताचा चरण म्हणतांना चरणांतीं व मध्येंच एकदोन ठिकाणीं दम घेण्यापुरती जेथें सोय असते, त्या स्थळांना ' यति ' म्हणतात. पृथ्वीवृत्तांत आठव्या अक्षरावर व सतराव्या अक्षरावर [ म्हणजे चरणान्तीं ] स्पष्ट यति आहेत. यतींच्या व्यवस्थेप्रमाणें वरील चरण असा लिहितां येईल—

**सदाश्रितपदा सदा— । शिवमनो विनोदास्पदा ।**

... ... ... ८ ... ... ... ...१७

अस्पष्ट यतिही ह्मणण्याच्या डौलाप्रमाणें मधून मधून येऊं शकतात. परंतु ते निश्चित नसल्यामुळें हिशोबांत घेण्यांत येत नाहींत. यतींचा संबंध गणविभागाशीं नसून, वृत्त गाण्याच्या चालीशीं असतो, हें यावरून लक्ष्यांत येईलच. ज्या स्थळावर स्पष्ट यति असतो, तेथें एकाद्या शब्दाचा अर्धवट तुकडा पडला, म्हणजे अडखळल्यासारखें होऊन मन विरस होतें. या दोषाला ' यतिभंग ' असें नांव आहे. असा यतिभंग या काव्याच्या पहिल्याच श्लोकाच्या शेवटच्या चरणांत झालेला आहे.

**गदारिदर नंदकाम्-। बुजधरा नमस्ते सदा ।**

## केका १ ली.

**सदाश्रितपदा ! सदाशिवमनोविनोदास्पदा !**
**स्वदासवशमानसा ! कलिमलांतका ! कामदा !**
**वदान्यजनसद्गुरो ! प्रशमितामितासन्मदा !**
**गदारिदरनंदकांबुजधरा ! नमस्ते सदा.**

**अर्थः**—साधुसन्त ज्याच्या पायाचा आसरा घेतात, शंकराच्या मनाला ज्याच्या ठायीं आराम लाभतो, ज्याचें मन आपल्या भक्ताचें अंकित असतें, जो दुर्बुद्धींतील पापाचा ठाव पुसून टाकितो व सर्व इच्छा पुरवितो, जो सर्व उदार महात्म्यांचा दीक्षागुरूच—श्रेष्ठ आचार्यच—आहे, असंख्य दुष्टांचा माज ज्यानें झाडून टाकिला आहे, आणि जो गदा, चक्र, शंख, नंदकखड्ग, व कमल, हीं आयुधें धारण करितो, त्या नारायणस्वरूपी परमेश्वरा, मी तुला निरन्तर नमन करितों.

**टिप्पणीः**—मोरोपंत हे रामभक्त म्हणून प्रसिद्ध आहेत. परंतु ते इतर देवतांचा द्वेष करीत होते, असें मुळींच नाहीं. किंबहुना, सर्व देव एकाच आद्यदेवाच्या विभूति आहेत, आणि ह्या आद्यदेव नारायणही परमेश्वराचें सगुणस्वरूप आहे, अशी त्यांची अचल श्रद्धा होती. या केकेंतील 'गदारिदरनंदकांबुजधरा' पर्यन्तचीं सर्व पदें संबोधनें असून, प्रत्येक पद परमेश्वराच्या गुणांचें गौरव दाखवीत आहे. 'सत+आश्रित+पद'=साधुभक्त+सेवित+पाय=साधुभक्तांनीं सेविलेले आहेत पाय ज्याचे तो. बहुव्रीहि समास. 'सदाशिव+मनः+विनोद+आस्पद'=शंकर +चित्त+आराम, सुख+स्थान. शैव व वैष्णव यांच्या मधील वैर प्रसिद्ध आहे. परंतु या वैराचें मूळ अज्ञानांत आहे. वास्तविक पाहतां 'शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः' या पुराणवचनानें शिव व विष्णु हे परस्परांचे परम एकनिष्ठ भक्त होते, हेंच सिद्ध होतें, या गोष्टीवर येथें कवीचा कटाक्ष आहे. 'स्व+दास+वश+मानस'=स्व+भक्त+स्वाधीन, अंकित+मन. भक्तांच्या निर्मळ प्रेमानें आकळलेला परमेश्वर आपल्या दासांचा दास बनतो. 'कलि'=दुर्बुद्धि. 'अन्तक'=अन्त करणारा. 'कामद'=इच्छित देणारा. 'वदान्य+जन+सद्+गुरु'=उदार+पुरुष+श्रेष्ठ+आचार्य. मनुष्याला औदार्यगुणाची प्रेरणा देणारी ईश्वरी दयाच होय. 'प्रशमित+अमित+असत्+मद'=शांत केलेला+असंख्य+दुष्ट+माज, गर्व, ताठा=झाडून टाकला आहे अगणित दुष्टांचा ताठा ज्यानें तो. बहु० स० 'अरि'=चक्र, सुदर्शन. 'दर'=शंख. 'नंदक' हें नारायणाच्या तरवारीचें नांव आहे. 'अंबुज'=कमळ. 'धर'=धारण करणारा. या मंगलाचरणांत कोणाही देवतेचें नांव नाहीं, परंतु

शंख, चक्र, गदा, नंदक, व पद्म, या आयुधविशेषांनीं नारायण देवताच अभिप्रेत आहे, असें निश्चित करतां येतें. 'नमस्ते सदा' हा चरणांश एक संस्कृत वाक्यच आहे. 'नमः+ते'=तुला नमन करितों. या मंगलाचरणाच्या श्लोकांत कवीनें आपण नारायणाची नमनभक्ति निरंतर करीत असल्याचें सांगून, या भक्तीनें मी अद्याप निर्मल कां झालों नाहीं, याबद्दल आश्चर्य चवथ्या केकेंत दाखविलें आहे.

( २ )

पदाब्जरज जें तुझें सकलपावनाधार तें;
अघाचलहि तारिले बहु तुवांचि राधारतें;
अजामिळ, अघासुर, व्रजवधू, बकी, पिंगळा,
अशां गति दिली; उरे न तृण भेटतां इंगळा.

अर्थः—( तुलाच निरन्तर नमन करण्याचें कारण असें कीं, ) पापपंक धुऊन टाकणाऱ्या जगांतील सर्व वस्तूंच्या शुद्धिसामर्थ्याचें मूळ ह्मणजे तुझ्या पायाच्या धूळीचा कण. हे राधारमणा, पापाचे केवळ डोंगरच अशा अघोरांचेंही तारण तूंच केलें आहेस. दुराचारी अजामिल, अत्याचारी अघदैत्य, अज्ञान वासनावश गोपीं, कपटी पूतना, वेश्या पिंगळा, अशांसारख्या पातक्यांनाही तूं मोक्षपदास चढविलेंस; ( आणि खरेंच, तुझी संगति घडल्याबरोबर त्यांचें पाप साफ नाहींसें होऊन त्यांनीं मोक्षपदाला पात्र व्हावें, हेंच स्वाभाविक आहे. ) अग्नीशीं गांठीभेटी झाल्यावर गवत टिकणें शक्यच नाहीं, ( तें जळून खाक होणारच. )

**टिप्पणी—**' पद+अब्ज+रज '=चरण+कमल+कण. ' पावन '=गंगाप्रभृति पापक्षालन करणारीं तीर्थक्षेत्रें व इतर पवित्र वस्तु. 'अघ+अचल'=पापाचे डोंगर. राधा+रत ' राधेच्या ठिकाणीं रमलेला. राधा व कृष्ण हीं

परस्पर प्रेमबद्ध झालेलीं होतीं. ‘ अजामिळ ’ हा जातीनें ब्राह्मण होता, पण दुर्वर्तनानें पतित झाला. परंतु त्यानें आपल्या एका मुलाचें नांव नारायण ठेविलें, आणि मृत्युकाळीं त्याच नांवाचा ध्यास व घोष त्यानें केल्यामुळें तो मोक्षास गेला. ‘ अघ ’ हा राक्षस व ‘ बकी ’ किंवा ‘ पूतना ’ ही राक्षसी, यांनीं कृष्णास मारण्याचे प्रयत्न केले, परंतु कृष्णानें ते सर्व प्रयत्न हाणून पाडून, उलट त्यांनाच ठार मारिलें, पण मोक्षपदाला नेलें. असें भागवत पुराणांत वर्णिलें आहे. ‘ पिंगळा ’ ही वेश्या होती. पण तिनें आपलें प्रेम व सर्व मनोवृत्ति परमेश्वरास अर्पण केल्यामुळें तिला मुक्तिपद मिळालें, अशी कथा आहे. ‘ इंगळ ’=अग्नि.

( ३ )

**तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें;**
**न तें अनृत, वर्णिती बुध जनीं सदाचार जें;**
**असें सतत बोलते शत, न एक ते; मीच ते**
**प्रमाण न म्हणों जरी, उचित माझिया नीचते.**

**अर्थ**—हे प्रभो, पापाचे केवळ सागरच, असे किती तरी दुराचारी तुझ्या पायाच्या धूळीकणानें शुद्ध केलेले आहेत, असें जें शाहणे सुर्ते शुद्धवर्तनी लोक सांगतात, तें खास खोटें नाहीं. ( शिवाय, ) असें नेहमीं सांगणारे एकदोन नाहींत, तर शेंकडों आहेत, मग मी एकट्यानेंच त्यांना अप्रमाण—बेभरंवशीक—म्हटलें, तर त्यानें उलट माझाच हलकेपणा सिद्ध होईल.

**टिप्पणी**—‘ शोधिले ’=शुद्ध, निष्पाप केले. ‘ अघ+निधि ’=पाप+सागर. ‘ अनृत ’=खोटें. ‘ सत्+आचार ’=चांगला आचार ज्यांचा, सद्वर्तनी. बहु० स० तृतीय चरणाचा पाठभेद-असे सतत ऐकते, सतत बोलते इ० ‘ प्रमाण ’=खरे, भरंवशीक. ‘ म्हणों ’=म्हणूं, म्हणेन. ( विध्यर्थ ) ‘ नीचते उचित ’=हलकेपणाला साजणारें, हलकटपणाला पाठपुरावा देणारें.

( ४ )

**तसाचि उरलों कसा ? पतित मी नसें काय ? कीं**
**कृपाचि सरली ? असेंहि न घडे जगन्नायकीं.**
**नसेन दिसलों कसा ? नयन सर्वसाक्षी रवी.**
**विषाद धरिला, म्हणों ? न सुरभी विष, क्षीर वी.**

**अर्थ**—[ मग, अशा प्रकारें मी तुला सतत शरण आलों असतां, आणि महान् महान् पापीही तुझ्या प्रसादानें निष्पाप होऊन परमपद पावले, हें निश्चित असतां, ] मी मात्र पूर्वींप्रमाणेंच अद्यापही उपेक्षा केलेला—हेळसांडलेला—कसा राहिलों आहें ? का, मी मुळीं पापीच नाहीं ? किंवा [ मी पापी असून ] तुमच्याजवळचा कळवळ्याचा सांठाच पतितांचें तारण करितांकरितां संपून गेला ? पण, तुम्ही विश्वाची काळजी वाहणारे परमेश आहां, तेव्हां तुमच्या करुणेला अंत असणें शक्यच नाहीं. कदाचित् मी अद्याप तुमच्या नजरेच्या टप्प्यांत आलों नसेन, असा तर्क बांधावा, तर तोही जुळत नाहीं, कां-कीं, ज्याची दृष्टी चुकवून कांहींच गुप्त राहूं शकत नाहीं, असा प्रत्यक्ष सूर्यच तुमचा डोळा आहे. बरें, तुम्हीं मजवर ( माझ्या असंख्य अप-राधांमुळें ) रोष केला आहे, असें म्हणावें, तर, गाय कितीही चिडली, तरी तिच्या ओटींतून दूधच निघतें, विष निघत नाहीं, त्याचप्रमाणें तुमच्या दयामय प्रकृतींतूनही रोषाची उत्पत्ति संभवत नाहीं.

**टिप्पणी**—'तसाच'=तुमच्या सेवेचा नाद लागण्यापूर्वीं जसा अशुद्ध व असमाधानी होतों, तसाच. ' नयन सर्वसाक्षी रवी,' पुरुषसूक्तांत 'चक्षोः सूर्योअजायत' म्ह० सूर्य हा परम पुरुषाच्या डोळ्यापासून झाला, असें वर्णन आढळतें. ' साक्षी '= पाहणारा. ' विषाद '=राग, रोष. ' सुरभि '=गाय. ' क्षीर '=दूध. ' वी '=विते, प्रसवते, उत्पन्न करते, देते.

( ५ )

व्रजावन करावया वसविलें नखाग्रीं धरा,
सलील तईं मंदराख्यहि नग स्व-पृष्ठीं धरा,
वराहतनु घेउनी उचलिली रदाग्रें धरा,
सुदुर्धर तुम्हां कसा पतित हा ? न कां उद्धरा ?

अर्थ—( मी पापभारानें इतका अवजड बोजा झालों आहें, कीं, मला उद्धरणें तुम्हांला शक्य नाहीं, असें म्हणावें, तर तुमचे अचाट पराक्रम पुराणांत कसे वर्णिलेले आहेत, तें पहा. ) वृन्दावनांतील गोकुळाचें संरक्षण करण्यासाठीं तुम्हीं प्रत्यक्ष गोवर्धन डोंगर आपल्या नखाच्या टोंकावर तोलून धरिला. ( समुद्रमंथनाच्या ) त्या पुराणप्रसिद्ध प्रसंगीं मन्दरपर्वत आपल्या पाठीवर सहजासहजीं वागविलात. वराहअवतार धारण करून तुम्हीं ( दैत्यांनीं पाताळीं चेपलेली ) पृथ्वी आपल्या सुळ्याच्या बोंथीनें वर काढलीत. मग अशा तुम्हांलाही झेंपणार नाहीं, इतका पापभारानें जड मी होणार तरी कसा ? ( जर इतका जड होणें शक्यच नाहीं, तर मग, ) माझें तारण तुम्हीं कां करीत नाहीं ? ( हा प्रश्न राहतोच. )

**टिप्पणी**—' व्रज+अवन'= गोकुळ+संरक्षण. ' धरा ' ( चरण १ )= डोंगराला. ' धरां ' ( चरण २ )=धारण करिते झालां. ' धरा ' [ चरण ३ ]= पृथ्वी. मन्दर+आख्य '= मन्दरनामक. मन्दर आख्या [ नाम, संज्ञा ] ज्याची तो. बहु. स. ' नग '= पर्वत. ' पृष्ठ '= पाठ. ' वराहतनु '= वराहाचें ( म्ह. रानडुकराचें ) रूप. ' रद+अग्र '=दांताचें टोंक, सुळ्याची बोंथी. ' सुदुर्धर '= धारण करण्यास-पेलण्यास-अत्यन्त कठिण. या केकेंत तीन पुराणकथांचा उल्लेख आहे, त्या अशाः—( चरण १ ) एकदा वृन्दावनांतील गोवळ्यांनीं आपली वार्षिक पूजा न

करितां, आपल्याऐवजीं श्रीकृष्णाची पूजा केली, म्हणून इंद्राला फार राग आला, आणि गोकुळास शासन लावण्याकरितां इंद्रानें त्यांच्यावर पर्जन्याचा कहर करून टाकिला. त्या वेळीं कृष्णानें सबंध गोवर्धन डोंगर आपल्या बोटावर छत्रीप्रमाणें धरून त्याच्या आसऱ्याखालीं गोकुळाचें रक्षण केलें. ( चरण २ ) देवदानवांनीं संगनमत करून अमृतलाभासाठीं समुद्राला ढवळण्याचें निश्चित केलें. त्या मंथनाकरितां अवजड मन्दरपर्वताचा माथ्या केला, परंतु तो पाण्यांत ठाम न राहतां खालीं-खालीं जाऊं लागला, तेव्हां नारायणानें कच्छाचें ( म्ह० कांसवाचें ) रूप धारण करून, मन्दराला आपल्या पाठीची ठास बैठक दिली. हाच दशावतारांपैकीं दुसरा कच्छावतार होय. ( चरण ३ ) दैत्यभारानें भारावलेली भूमि एकदां चेपली जाऊन पाण्यांत पाताळीं खचूं लागली, तेव्हां नारायणानें वराहरूप धरून, तिला आपल्या सुळ्यांनीं वर उखळून पाण्यावर संभाळून धरिली. हाच दशावतारांपैकीं तिसरा वराहावतार होय. या केकेंतील गोवर्धन डोंगर, मन्दरपर्वत, व अखिल पृथ्वी, यांच्या जडपणाचें प्रमाण चढतें असल्यामुळें अर्थाचा क्रमाक्रमानें उत्कर्ष झाला आहे. या अर्थालंकाराला ‘ सारालंकार ’ असें नांव आहे.

( ६ )

**नतावनधृतव्रता ! ज्वलन तूंचि बाधावनीं,**
**पदप्रणतसंकटीं प्रजव तूंचि, बा धावनीं;**
**दया प्रकट दाखवी कवण, सांग, त्या वारणीं,**
**सतीव्यसनवारणीं, जयजयार्थ त्या वा रणीं ?**

**अर्थ**—नम्र झालेल्या भक्ताचें रक्षण करण्याचें ब्रीद ज्यानें स्वीकारलें आहे, अशा प्रभो, तूंच दुःखरूपी रानाचा ( त्याला जाळून भस्म करणारा ) वणवा आहेस. तुझ्या चरणापाशीं शरण आलेल्यांच्या संकटकाळीं साहाय्यार्थ धांवणें करण्यांत तूंच अत्यंत वेगवान् आहेस. त्या पुराणप्रसिद्ध गजेन्द्रनामक हत्तीकरितां, त्या सती द्रौपदीवरील किटाळाचें निवारण करण्याकरितां, किंवा त्या भारतीयुद्धांत अर्जु-

नाच्या विजयाकरितां, कोण बरें स्पष्ट दया दाखविता झाला, तें मांग पाहूं. [ हे परमेश्वरा, तूंच नाहीं का ती दाखविलीस ? ]

**टिप्पणी**—' नत+अवन+धृत+व्रत '=नम्र+रक्षण+स्वीकारलेलें+ब्रीद, नियम=नम्रांचें रक्षण हेंच अंगीकृत ब्रीद आहे ज्याचें असा. बहु० स० ' बाधा+वन '=दुःख+अरण्य. ' पद+प्रणत+संकट '=चरण+शरणागत+दुःखप्रसंग=चरणीं शरण आलेल्यांचा दुःखप्रसंग. ' प्र+जव '=प्रकृष्ट+वेग, अत्यंत वेग ज्याचा असा. बहु० स०.' त्या वारणीं '–विष्णूचे द्वारपाळ जय–विजय यांना नारदाचा शाप झाला होता, व त्याच्या प्रभावानें पहिला गजेन्द्र नांवाचा हत्ती झाला, व दुसरा नक्र म्ह० मगर झाला. ज्या सरोवरांत हा नक्र होता, त्याच सरोवरावर जलविहाराकरितां एकदां गजेंद्र आला. तेव्हां त्या नक्रानें त्याचा पाय पकडून त्यास पाण्यांत बुडविण्याचा प्रयत्न चालविला, व गजेन्द्र प्राणसकटांत सांपडला. त्या वेळीं त्यानें विष्णूचा मोठ्या काकुळतीनें धांवा केला, आणि विष्णूनेंही धांव्याबरोबर धांवणें करून सुदर्शनाच्या तडाख्यानें नक्राचें जाबाड फोडलें, गजेन्द्राला संकटांतून सोडविलें, आणि दोघांनाही शापयोनींतून मुक्त केलें. ' सती+व्यसन+वारण '=द्रौपदी+संकट, किटाळ+निवारण. येथें द्रौपदीवर आलेल्या वस्त्रहरण, दुर्वासभिक्षा, इत्यादि भयंकर प्रसंगांतून तिला कृष्णानें सोडविलें, या गोष्टीवर कवीचें लक्ष आहे. ' जय+जय+अर्थ '=अर्जुन+विजय+साठीं. भारती युद्धांत अर्जुनाचें सारथ्य करून कृष्णानें अनेक युक्त्यांनीं त्याला विजय मिळवून दिला, हें प्रसिद्धच आहे. ' तो–ती–तें ' हें सर्वनाम ' विशेष प्रसिद्ध, नांवाजलेलें ' अशा अर्थी योजण्यांत येतें.

( ७ )

**सुपात्र न रमाहि यद्रतिसुखास, दारा परी,**
**असा प्रभुहि सेवकां भजसि खासदारापरी;**
**प्रियाकुचतटीं जिहीं न बहुवार पत्रावळी,**
**तिहीं अमित काढिल्या नृपमखांत पत्रावळी.**

**अर्थ**—लक्ष्मी प्रत्यक्ष पत्नी खरी, परंतु तिलाही ज्याच्या नाजुक प्रेमसुखाची जोड लाभण्याइतकी श्रेष्ठ योग्यता नाहीं, तो तूं सर्वैश्वर्य-

संपन्न परमेश्वर आपल्या ( अर्जुनासारख्या प्रेमळ व एकनिष्ठ ) दासांची मोतद्दार होऊन चाकरी करितोस. आपल्या आवडत्या स्त्रीजनाच्या वक्षःस्थळावर रंगीबेरंगी उट्यांची नक्षी काढण्याकरितांही जे ( तुमचे हात ) फारसे भागले नाहींत, त्यांनींच धर्मराजाच्या राजसूययज्ञांत ( ब्राह्मणांच्या ) उष्टया पत्रावळी काढण्याची कामगिरी बजावली. [ तेव्हां, यावरून तुला आपले भक्त अतिप्रिय आहेत, ते प्रत्यक्ष रमेपेक्षांही अधिक आवडते आहेत, हें उघडच सिद्ध होतें. ]

**टिप्पणी**—' सु+पात्र '=यथायोग्य+स्थान. ' यद्+रति+सुख '=ज्याच्या नाजुक प्रेमाचा गोड अनुभव. ' दारा '=धर्मपत्नी, ' खासदार '=घोड्याची चाकरी करणारा मोतद्दार, हलका नोकर. ' प्रिया+कुच+तट'=आवडती स्त्री+स्तन+प्रदेश. 'बहुवार'=पुष्कळ वेळां, फारशा. ' जिहीं, तिहीं'=ज्यांहीं, त्यांहीं; ज्यांनीं, त्यांनीं. 'पत्र+आवळी'=पान+रांग, पानांची नक्षी, वेलबुट्टी. पूर्वकाळीं स्त्रियांच्या गालांवर, वक्षःस्थळावर, व हातावर, रंगीबेरंगी उटीनें वेलबुट्टी काढण्याची चाल होती. बरेच वेळां अशी वेलबुट्टी पती स्वतः आपल्या हातांनीं आपल्या पत्नींच्या अंगावर काढीत असत. ' अमित '= असंख्य. ' नृप+मख '= राज+यज्ञ, धर्मराजानें केलेला राजसूय यज्ञ. ब्राह्मणांची उष्टीं काढणें, हें काम अत्यन्त पुण्यकारक असल्यामुळें श्रीकृष्णानें ही वरवर क्षुद्र भासणारी कामगिरी मोठ्या खुबीनें स्वतःकडे लावून घेतली होती. ' पत्र+आवळी '= पानें एकत्र जोडून भोजनाकरितां केलेलें पानांचें ठिकोळें. तृतीय चरणांतील ' पत्रावळींशीं ' संदर्भ असतांना ' काढणें ' धातूचा अर्थ ' रेखाटणें, लिहिणें, ' असा होतो, परंतु चतुर्थ चरणांतील ' पत्रावळींच्या ' संबंधीं त्याचा अर्थ गोळा करून टाकणें, ' असा होतो, हा शब्दचमत्कार लक्ष्यांत घेण्यासारखा आहे. दुसऱ्या चरणांत ' प्रभुहि सेवकां भजसी ' या वर्णनप्रकारांत ' विरोधाभास ' नांवाचा अलंकार आहे.

( ८ )

**न पावसि, म्हणोनि मी म्हणतसें तुला आळशी;**
**बरी न असदुक्ति हे, रविसखोत्थिता आळशी;**

**असंख्य जन तर्पिले, क्षुधित एकला जेमनीं**
**चुकेल, तरि त्यास दे, परि वदान्य लाजे मनीं.**

**अर्थ**—[ तेव्हां, इतका पराक्रमी व भक्तवत्सल असतांही ] तूं मला अजून प्रसन्न होत नाहींस, ह्मणून मी तुला ' आळशी ' म्हणतों; परंतु, सूर्याचा मित्र जो सत्राजित् त्यानें ( स्यमन्तक मण्याच्या चोरीचा ) तुमच्यावर जो आळ घातला होता, त्याप्रमाणेंच हा आळशीपणाचा खोटा आरोप तुमच्यावर करणें योग्य नाहीं, ( असें मला विचारान्तीं वाटतें, कारण, माझें जरी तुम्ही तारण केलें नाहीं, तरी इतर असंख्य जनांचा उद्धार केला आहे. तेव्हां तुम्ही आळशी खास नाहीं; तर, मी तुमच्या नजरेस अजून पडलों नसावा, असें संभवतें. परंतु हा संभवही तुम्हाला भूषणावह आहे, असें नाहीं. कारण, ) एकाद्या उदार दात्यानें असंख्य लोकांना जेवण घालून संतुष्ट करावें, पण एकटाच कोणी भुकेला चुकून जेवायचा राहावा, आणि ( मग तो उमगून आला म्हणजे ) तो दाता त्यालाही अन्न देतोच, परंतु ( दुर्लक्ष्यानें घडलेल्या चुकीची रुखरुख लागून ) तो मनांत खट्टू झाल्यावांचून राहत नाहीं. ( तेव्हां माझा उद्धार तुम्हीं वेळींच न करितां, अतिकाळ झाल्यावर केलात, तर तुम्हांलाही मनांत खट्टू व्हावें लागेलच कीं नाहीं ? )

**टिप्पणी**—' असदुक्ति '=खोटें भाषण, मिथ्या आरोप. ' सत् '=खरें, ' असत् '=खोटें, ' उक्ति '=भाषण. ' रवि+सख+उत्थित '=सूर्य+मित्र+उठलेली, सूर्यमित्रापासून निघालेली, सत्राजितानें उठवलेली. 'आळ' ( पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी नाम )=खोटा आरोप. सत्राजित् हा सूर्याचा मित्र होता. सूर्यानें त्याला स्यमन्तक नांवाचा एक अपूर्व तेजस्वी मणि दिला. तो मणि चोरीस गेला असतां, सत्राजितानें

त्या चोरीचा आळ कृष्णावर घातला. तेव्हां हा आळ दूर करण्यासाठीं कृष्णानें मोठी खटपट करून त्या चोरीचा पत्ता लावला व तो मणि परत आणून सत्राजितास दिला, अशी भागवती कथा आहे. ‘ तर्पिले ’=तृप्त केले, संतोषविले. ‘ एकला ’= एकटा. ‘ जेमन ’=जेवण. ‘ वदान्य ’=उदार दाता.

( ९ )

**अगा प्रणतवत्सला ! म्हणाति त्या जनां पावलां,**
**म्हणून तुमच्याच मी स्मरतसें सदा पावलां;**
**‘ करूं बरि कृपा, हरूं व्यसन, दीन हा तापला’—**
**असें मनिं धरा; खरा भरंवसा मला आपला.**

**अर्थ**—हे भक्तवत्सल प्रभो, त्या ( मागें उल्लेखिलेल्या ) जनांना तुम्हीं तारिलें, असें ( पुराणेतिहास लिहिणारे ) सांगतात, म्हणून ( मोठ्या विश्वासानें व आशेनें ) मी तुमच्या चरणांचें निरन्तर ध्यान करितों. तेव्हां तुम्हींही आपल्या मनांत असें आणावें, कीं, ‘ हा खरोखरच फार गांजला आहे. म्हणून याच्यावर आम्ही प्रसाद करूंच व याचें संकट निवारूंच. ” कारण माझा सर्व आधार खरोखर तुम्हीच आहां.

**टिप्पणी**—‘ प्रणत+वत्सल ’=नम्र भक्त+प्रेमळ, शरण आलेल्या विषयीं कनवाळू. ‘ पावलां ’ ( चरण १ )=प्रसन्न झालां. ‘पावलां’ ( चरण २ )=पायांना.

( १० )

**मला निरखितां भवच्चरणकन्यका आपगा**
**म्हणे, ‘ अगइ ! ऐकिलेंहि न कधीं असें पाप, गा ! ’**
**कर श्रवणिं ठेविते, नुघडि नेत्र, घे भीतिला;**
**न घालिन भिडेस मी, जरिहि कार्यलोभी, तिला.**

**अर्थ**—( माझा सर्व आधार तुम्ही एकटेच कसे आहां, तें पहा. ) आपल्या पायापासून निघालेली गंगानदी माझी पापमूर्ति पाहून चमकून

म्हणते, " अगबाई ! तुझ्या एवढें विलक्षण पाप आजपर्यन्त कधींही मी ऐकिलेंही नाहींरे ! ( मग प्रत्यक्ष पाहण्याचें बोलायलाच नको ). " ( असे घाबरेपणाचे उद्गार काढून ) ती कानावर हात ठेवते, डोळे सुद्धां उघडीत नाहीं, भयंकर धास्तीच घेते. ( तेव्हां, माझ्या पापदर्शनानें तिची उडालेली ही त्रेधा पाहून, उलट मलाच तिची कींव येत आहे, आणि म्हणून, ) मला जरी आपलें उद्धाराचें कार्य साधण्याची ओढ आहे, तरीही तिला भीड घालण्याच्या भरीस मी पडणार नाहीं.

**टिप्पणी**—' भवत्+चरण+कन्यका '=तुमच्या चरणांची मुलगी, तुमच्या पायापासून उद्भवलेली. ' आपगा '=नदी. विष्णूच्या पायाच्या तीर्थापासून गंगानदीचा उगम झालेला पुराणान्तरीं वर्णिला आहे. गंगेच्या पाण्यांत सर्व तऱ्हेचीं पापें साफ धुऊन टाकण्याचें सामर्थ्य आहे, असें समजतात. परंतु मोरोपंत म्हणतात, " माझें पाप इतकें भयंकर आहे, कीं, त्याच्या दर्शनानें सर्वपापनाशिनी भागीरथीची बोबडी वळते. मग ती मला कसची शुद्ध करणार ? तेव्हां, परमपवित्र तीर्थानें ज्या पाप्याला झिडकारलें, त्यानें, हे नारायणा, तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाचा म्हणून भरंवसा धरावा ? " मोरोपंतांनीं काशीयात्रा करून परत आल्यावर हें काव्य रचलें. आपण काशीयात्रा केली, पण गंगाबाईच्या तीर्थाच्या स्नानपानानें आपली पापशुद्धि झाली नाहीं, असें त्यांस मनांत वाटत होतें.

( ११ )

**सदैव नमितां, जरी पद ललाट केलें किणें,**
**नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें.**
**नता करुनि मुक्तही, म्हणसि, ' मी बुडालों रिणें; '**
**अशा तुज न जो भजे मनुज, धिक् तयाचें जिणें !**

**अर्थ**—( आतां आपण म्हणाल, कीं, " गंगेनें एक तुझी निराशा केली, पण इतर देवदेवता आहेत, त्यांना शरण जाऊन

त्यांचा प्रसाद मिळीव व आपलें कार्य साधून घे." पण हे प्रभो, तोही प्रयोग मीं करून पाहिला आहे. त्याची कहाणी ऐका. ) सर्व देवदेवतांना नमस्कार घालतां घालतां, घट्टयांनीं माझें कपाळ आपलें कायमचें ठाणें केलें आहे. ( पण माझा उद्धार झाल्याचें कांहींच लक्षण अनुभवास येत नाहीं. ) म्हणून तुमच्या चरणकमला-शिवाय दुसरें कोणीही माझें तारण करणारें नाहीं. हे परमेश्वरा, नम्र दासाला मोक्षाची मिरास देऊन, उलट " मीच दासाच्या भक्तीच्या ऋणांत बुडालों आहें, ( त्याची फेड कशी होईल ती होवो ! ) " असें तूं म्हणत असतोस. मग, अशा तुला भक्तवत्सलाला जो माणूस भजणार नाहीं, त्याच्या अभागी जिण्याला धिक्कार असो !

**टिप्पणी**—अन्वय ( श्लोकार्ध १ ) ( मी ) सदैव ( देवदेवतांना ) नमितां, जरी किणें ( =घट्टयानें ) ( माझें ) ललाट ( =कपाळ ) पद ( =वसतिस्थान, कायमचें ठाणें ) केलें, ( तरी ) भवत्पदाब्जाविणें मज इतर तारिता नसे. तृतीय चरणांत ' विरोधाभास ' अलंकार आहे. ' जिणें '=जगणें.

( १२ )

**" पटुत्व सकलेंन्द्रियीं, मनुजता, सुवंशीं जनी,**
**द्विजत्वहि दिलें भलें, बहु अलभ्य जें कीं जनीं;**
**यशःश्रवणकीर्तनीं रुचि दिली, तरी हा, ' वरा '**
**म्हणे, ' अधिक द्याच कीं, ' अखिल याचकीं हावरा! "**

**अर्थ**—( हे प्रभो, कदाचित् तुम्हीं आपल्या मनांत म्हणाल, कीं, ) " सर्व इंद्रियांच्या ठायीं चलाखपणा, मनुष्यत्व, उत्तम कुळांत जन्म, आणि लोकांत जें अत्यंत दुर्मिळ गणलें जातें तें बहुमोल ब्राह्मणत्वही, मी याला दिलें; शिवाय, माझीं पवित्र चरितें ऐकण्याची व स्वतः गाण्याची गोडी—

आवड–हा गुणही दिला. ( परंतु इतक्या मोठमोठ्या देणग्या एकी-मागून एक बहाल केल्या, ) तरीहीं 'मला आणखी कांहीं तरी देणगी द्याच, हो !' अशी याची टकळी चालूच आहे. तेव्हां एकंदर मागणे-कऱ्यांमध्यें हा बिलंदर लोभट आहे खरा !"

**टिप्पणीः**—'पटुत्व'=चलाखपणा, तीक्ष्णता. 'जनी' ( स्त्रीलिंगी ) जन्म. सदाचारानें वागून, ज्ञानविज्ञान संपादून, व ईश्वरभक्ति करून, जीवात्म्याचा उद्धार करण्याकरितां जी सामग्री लागते, तिचा उल्लेख या केकेंत कवीनें केला आहे. परंतु ही सर्व सामग्री सिद्ध असतांही, मोक्षानंदाचा अनुभव मनाला प्रत्यक्ष आल्यावांचून खरी कार्यसिद्धि या नुसत्या सामग्रीनें होऊं शकत नाहीं व अन्तःकरणाची मळमळ-तळमळ शांत होत नाहीं, हेंही मुख्य तत्त्व येथें सुचविलें आहे.

( १३ )

**असें न म्हणशील तूं, वरद, वत्सल, श्रीकरा !**
**परंतु मज भासलें, म्हणुनि जोडितों मी करां;**
**दिलें बहु बरें खरें, परि गमे कृपा व्यंग ती.**
**अलंकृतिमती सती मनिं झुरे, न जों संगती.**

**अर्थ**—( वरच्या सारखे उद्गार कदाचित् तूं आपल्या मनांत काढशील, असें मला क्षणमात्र भासलें. पण आतां मला खास वाटतें कीं, ) हे लक्ष्मीनाथा, तूं उदार व कनवाळू असल्यामुळें असें कधींही म्हणणार नाहींस; परंतु, ' कदाचित् तूं असें म्हणशील, ' असें ( क्षणमात्रच का होईना, पण ) मला भासलें, ( हा मोठाच अपराध माझ्या हातून घडला, ) म्हणून मी हात जोडून तुमची क्षमा याचितों. महाराज, आपण मला पुष्कळ देणग्या दिल्या आहेत, हें अगदीं खरें आहे, परतु हा एवढा प्रसादही मला उणाच वाटतो; ( कारण, असें पहा, ) एकादी पतिव्रता दागदागिन्यांनीं कितीही नटविली, तरी जोंपर्यंत तिला

पतीचा सहवास लाभला नाहीं, तोंपर्यंत ती आपल्या मनात झुरतच राहणार.

**टिप्पणी**—' वर+द'= वर देणारा, उदार. ' वत्सल '= प्रेमळ. ' श्री+धर '= लक्ष्मीला धारण करणारा, लक्ष्मीपति. ' व्यंग '= वि+अंग= विकल आहे अंग जिचें ती= उणी, कमतरतेची. ' अलंकृतिमती '= दागदागिन्यांनीं मढवलेली. ' सती '= पतिनिष्ठ स्त्री, पतिव्रता. ' संगती '= सहवास, सान्निध्य, निकटपणा.

( १४ )

**कराल पुरती दया, तरि असो दिलें पावलें;**
**परंतु, हरि ! एकदां त्वरित दाखवा पावलें;**
**प्रसाद करणें मनीं जरि नसेल, हें आवरा;**
**जया बहु, तयास द्या; मज कशास ? मी हावरा !**

**अर्थ**—हे प्रभो, तुम्हीं माझ्यावर जर पुरती दया करणार असाल, तरच या दिलेल्या सर्व देणग्या खरोखर मला पोंचल्या असें होऊन त्यांचें चीज होईल. पण, हे हरे, ( जर पूर्ण दया केव्हां तरी करण्याचें तुमच्या मनांत असेल, तर ) तुमच्या पायांचें दर्शन शक्य तितक्या लवकर होऊं द्या. आणि अशी परम कृपा करण्याचें तुमच्या मनांतच नसेल, तर ( या दिलेल्या देणग्यांत कांहींच तथ्य नाहीं, ) या देणग्या तुम्ही आपल्या खुशाल परत घ्या, व त्या ज्याला बहुमोल वाटत असतील, त्याला द्या. मला या कशाला देतां ? मी तर बोलून चालून हावराच आहें, ( आणि म्हणून माझें समाधान एवढ्यानेंच कदापि व्हावयाचें नाहीं. )

**टिप्पणी**–' दिलें '=दिलेली वस्तु, देणगी. ' पावलें ' ( चरण १ )=पोंचलें, पटलें. ' पावलें ' ( चरण २ )=पाय. ' आवरणें '=मागें ओढून घेणें, आटोपणें, परत घेणें. ' बहु '=बहुमोल, किमतीचें, मोठें.

( १५ )

'दिलें फिरुनि घेतलें,' अशि अकीर्ति लोकीं न हो;
सुनिर्मळ तुझीं पदें कधिं तरी विलोकीन, हो!
निजप्रियजनांकडे तरिहि दे हवाला; जशी
पडेल समजाविशी, तशि करोत; कां लाजशी?

**अर्थ**—('दिलेलें दान परत घ्या,' असें मी तुम्हांला सांगितलें खरें, परंतु दात्याला तसें करणें फार लाजीरवाणें आहे. म्हणून) 'दिलेलें दान परत घेतलें,' असा तुमचा लोकांत दुर्लौकिक होणें कांहीं इष्ट नाहीं. (माझें काय, आज नाहीं, उद्यां, किंवा) केव्हां तरी मला तुमच्या अत्यंत शुद्ध चरणाचें दर्शन घडणारच आहे. पण, आतां इतकें तरी करा, कीं, माझें तारण करण्याची कामगिरी तुम्ही आपल्या आवडत्या साधुसंतांकडे सोंपवून द्या; मग ते माझी जुळेल तशी समजूत घालोत, (तें मला सर्वस्वीं मान्य आहे;) (अशी व्यवस्था करण्यांत) तुम्हांला लाज वाटण्याचें काय कारण आहे?

**टिप्पणी**—'दिलें'=दिलेलें दान. 'अकीर्ति'=अपकीर्ति, दुर्लौकिक, नापत. 'हवाला'=हमी, अधिकार. 'समजाविशी'=समजूत, समाधान. 'लाज'=संकोच, अवघड.

( १६ )

अहा! निपट धृष्ट मी प्रभुवरासि 'कां लाजशी?'
म्हणें! तुज नसो तशी विकृति, भाविकाला जशी.
परंतु अपराध हा गुरु, म्हणोनि शिक्षा करीं;
असोचि धरिली नयच्युतदमार्थ दीक्षा करीं.

**अर्थ**—अरेरे! मीं कमालीचा उद्धट होऊन त्या जगन्नियन्त्या परमेश्वराचीही लाज काढिली! परंतु कातावून विकारवश झालेला भक्त

उद्धट बनला, तरी ( हे दयामय प्रभो, ) तूं मात्र विकारवशतेनें क्रोधाविष्ट होऊं नयेस. तरी पण माझ्या हातून फारच मोठा—अक्षम्य—अपराध घडला आहे, ह्मणून ( दया बाजूस सारून ) मला शिक्षा कराच; ( आणि असें करणें तुमचें कर्तव्यच आहे, कारण, ) नीतिमर्यादा सोडून स्वैर वृत्तीनें वागणाऱ्याचें पारिपत्य करण्याचें कंकणच तुम्हीं हातीं बांधिलें आहे.

**टिप्पणी—**' निपट '=अगदीं, निव्वळ, पक्का. ' धृष्ट '=उद्धट, दांडगा. ' विकृति '=विकार; राग, लोभ, मत्सर, इ० ' भाविक '=भोळा भक्त. ' गुरु '= मोठा, ढोबळ. ' नय+च्युत+दम+अर्थ '=नीतिमर्यादा+ढळलेला+नियमन+साठीं= नीतिमर्यादेपासून ढळलेल्यांच्या नियन्त्रणाकरितां, स्वैर वागणाऱ्यांना आळा घालण्या-साठीं. ' दीक्षा करीं धरणें '=कंकण हातीं बांधणें, व्रत घेणें, प्रतिज्ञा करणें.

( १७ )

**सदैव अपराध हे रचितसें असे कोटि, गा !**
**स्वयेंहि कथितों, नसे तिळहि लाज, मी कोटिगा;**
**अजांडशतकोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवा,**
**न त्यांत अवकाश या, स्थळ दिलें तदा कां दवा ?**

**अर्थः—**अहो, मी अशा प्रकारचे क्रोडोगणती अपराध नेहमींच करतों; आणि त्यांची स्वतःच आपल्या तोंडानें कबुली देतों; व असें करतांना तिळभरही लाजत नाहीं; तेव्हां एकंदरींत मी पक्का कोडगा आहें, हेंच खरें. ( पण अशा प्रकारें कोडगेपणाचा जरी मी अगदीं अर्क असलों, तरी, ) ज्या आपल्या विशाळ पोटांत ब्रह्माण्डांच्या शेंकडों कोटी सहज सामावतात, त्या पोटांत माझ्या अपराधाच्या या कोटी घालण्यास जागा नसेल, तर मग त्या कृष्णावतारांतील दावाग्नीला आपण जेव्हां गिळलात, तेव्हां त्याला कशी बरें जागा करून दिलीत ?

**टिप्पणी**:—'कोटिगा'=कोडगा, लोंचट, अवीट, खमंग. 'अज+अंड+शत+कोटि'=शेंकडों कोटी ब्रह्मांडें, सर्व विश्व. ब्रह्मदेवानें प्रथमतः एक सोन्याचें अण्डें उत्पन्न केलें, व त्यांतून विश्वाची उत्पत्ति झाली, अशी एक कल्पना आहे. 'उदर'=पोट. 'अवकाश'=जागा, रीघ. 'दव' ( पुल्लिंगी नाम )=वणवा, दावाग्नि. गोकुळांत एकदां वणवा लागला असतां, तो कृष्णानें गिळून गवळ्यांचें रक्षण केलें, अशी भागवती कथा आहे.

( १८ )

**तुझ्या जिरविले बहु प्रणतमंतु पोटें; पण**
**त्यजी मदपराध हें; मजकडेचि खोटेपण;**
**दवाग्नि जठरीं अतिक्षुधित, त्यास हें अन्न द्या;**
**वितृष्ण करिती श्रितां तुमचिया दयासन्नद्या.**

**अर्थ**:—तुझ्या या पोटानें ( आजपर्यंत ) शरण आलेल्या दासांचे पुष्कळ अपराध गिळून पचविले आहेत; परंतु हें पोट ( आज ) माझेच तेवढे अपराध गिळण्याचें नाकारतें; तेव्हां माझ्या स्वतःच्या ठिकाणींच कांहीं तरी गोम असली पाहिजे. ( पण मी आतां एक युक्ति सुचवितों, ती ही, कीं, जर माझे जड अपराध तुमच्या पोटाला पचत नसतील, तर ) तुमच्या पोटांत जो प्रखर खवखवलेला दावाग्नि आहे, त्याला या माझ्या अपराधांची अन्नाहुति द्या. ( ही युक्ति केवळ माझ्या कार्यसाधुपणाची आहे असें नाहीं, तर ती तुमच्या स्वभावासही साजेशीच आहे. कारण, हा दावाग्नि आतां तुमचा आश्रित झाला आहे, आणि ) आश्रितांची तहानभूक भागवून त्यांस तृप्त करणें, हें तुमच्या दयारसाच्या पवित्र नद्यांचें शीलच आहे.

**टिप्पणी**–'प्रणत+मन्तु'=शरणागत+अपराध; दासांचे अपराध. 'मत्+अपराध'=माझे अपराध. 'खोटेपण'=दोष, उणेपणा, गोम. 'वितृष्ण'=विगत (गेलेली, भागलेली)

आहे तृष्णा ( अन्नपाण्याची इच्छा ) ज्यांची असे, तहानभूक शांत झालेले. 'दया+सत्+नद्या'=करुणा+चांगल्या, पवित्र+नद्या, दयेचे पवित्र प्रवाह.

( १९ )

**न होय कवणाहि, तें तुमचियाचि लीलालसें**
**पदें चरित दाविजे त्रिजगदब्जकीलालसें;**
**मदुद्धरण मात्र कां जड तुम्हां दिसे ? वारिती**
**स्वकव्यसन मर्त्यही, न करितीच सेवा रिती.**

**अर्थ**—पाणी जसें कमळाला सांवरून धरतें, तसें सर्व त्रिभुवनाला सांवरून धरण्याचें जें कार्य कोणालाही करितां येणार नाहीं, तेंच अचाट कार्य तुझा चरण अगदीं सहजासहजीं—विशेषसे सायास न करितां—पार पाडतो; मग माझा उद्धार करण्याचें मात्र तुम्हांला अवजड भासावें काय ? अहो, सामान्य माणसेंसुद्धा आपल्या आश्रितांची संकटबाधा दूर करितात, आणि त्यांनीं केलेली चाकरी निष्फळ होऊं देत नाहींत. ( तेव्हां माझें संकट वारणें हें तुम्हां प्रभुवरांना भूषणावह आहे; शिवाय, मी आजपर्यंत केलेल्या भक्तीचा तो योग्य मोबदलाही आहे. )

**टिप्पणी**—अन्वय (पूर्वार्धे)-कवणाहि न होय तें त्रिजगदब्जकीलालसें चरित तुमचियाचि लीलालसें पद दाविजे. 'लीला+अलस'=लीला+मंद, मौजेनें, विशेष तसदी न वाटणारें, घेणारें. 'लीलालस' हें 'पद' या नामाचें विशेषण आहे. 'पदें' ही तृतीया विभक्ति आहे, आणि नामाप्रमाणेंच त्याच्या विशेषणांनाही विभक्तिप्रत्यय लावण्याचा जो परिपाठ पद्यभाषेंत आढळतो, त्यास अनुसरून 'लीलालसें' ही विशेषणाची तृतीया विभक्ति योजिली आहे 'लीलालसें पदें'=लीलालस पदानें, गमत गमत वावरणाऱ्या पावलानें, सहजासहजीं चालणाऱ्या पायानें. 'त्रि+जगत्+अब्ज+कीलाल+सें=तीन+भुवन+कमल+पाणी+असें=त्रिभुवनरूपी कमलास पाणी असें, कमलाला आधारभूत जसें पाणी, तसें त्रिलोकीला आधारभूत होणें यासारखें. हें 'चरित' (=कृत्य, चरित्र लीला, ) या नामाचें विशेषण. 'दाविजे'=दाविलें जातें, दाखविलें जातें, केलें जातें.

'पदें चरित दाविजे,' कर्मणि प्रयोग, 'चरित' हा कर्ता. 'पद चरित दावितें,' कर्तरि प्रयोग, 'पद' हा 'कर्ता, 'चरित' हें कर्म. 'मदुद्धरण'=मत्+उद्धरण' माझा उद्धार, माझें तारण. 'स्वक+व्यसन'=आश्रित+संकट, आपल्या आश्रयास असणाऱ्या लोकांचें दुःख. 'रिती'=निष्फळ, बिनमोबदल्याची.

( २० )

**दयाब्द वळशील तूं, तरि न चातकां सेवकां**
**उणें किमपि; भाविकां उबगशील तूं देव कां ?**
**अनन्यगतिकां जनां निरखितांचि सोपद्रवा,**
**तुझेंचि, करुणार्णवा ! मन धरी उमोप द्रवा.**

**अर्थ**—हे प्रभो, तूं दयारसाचा मेघ जर (अनुकूळ होऊन) इकडे वळलास, तर मग भक्तरूपी चातकांना कसलीही वाण राहणार नाहीं, कारण, (मग त्या चातकांप्रमाणें प्रसादाकरितां तान्हेलेल्या भक्तांना पाहूनही तूं) वैभवशाली प्रभु आपल्या भोळ्या श्रद्धाळू भक्तांचा कंटाळा करशील हें शक्य तरी आहे काय? हे दयासागरा, ज्यांना तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणाचाही आधार नाहीं, अशा दुःखपीडित लोकांना पाहतांक्षणींच, तुझ्याच मनाला कळवळ्याचा अपरंपार पाझर फुटतो.

**टिप्पणी**—'दया+अब्द'=करुणा+घन. ढग जसा पाण्यानें भरलेला असतो, तसा दयेनें भरलेला. 'चातक'-या पक्ष्याचा असा स्वभाव सांगतात, कीं, तो जमिनीवरील पाणी कधींही पीत नाहीं. कितीही तहान लागली, तरी पावसाच्याच पाण्याची वाट पहात तिष्ठत असतो. पावसाळ्यांतील सजल मेघ त्याच्या तोंडांत पाणी घालून त्याचे कष्ट दूर करितात. 'भाविक'=श्रद्धाळू, भोळा. 'उबगणें'=त्रासणें, कंटाळणें. 'देव' हा शब्द 'दिव्=प्रकाशणें' या धातूपासून आला आहे, व त्याचा मूळचा अर्थ 'तेजस्वी, प्रतापी, वैभवशाली,' असा आहे. 'अन्+अन्य+गति+क' नकारदर्शक उपपद+दुसरा+आधार+विशेषणदर्शक प्रत्यय=नाहीं दुसरा आधार ज्यांना असे, तुझ्यावांचून अन्यत्र ज्यांना थारा नाहीं असे निराश्रित. बहु० स० 'स+ उपद्रव =बाधा ज्यांना झाली आहे असे, पीडित, दुःखी. बहु० स० 'उमोप'=उमाप, विपुल, पुष्कळ. 'द्रव'=पाझर, दयेचा ओलावा.

( २१ )

कळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं,
तयांत अविशुद्ध मी, शलभ जेंवि दावानळीं;
व्रणार्थ पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे
स्मरादि रिपु मन्मनीं; अहि न काळ भेका कसे ?

अर्थ—अत्यन्त शुद्ध अशा नळ राजाशीं कलीनें अत्यन्त भयंकर दुष्टावा मांडला; आणि मी तर, अनेक पापांनीं लडबडलेला असल्यामुळें; जसा वणव्यांत एकादा बारीकसा टोळ सांपडावा, तसा या कलीच्या तडाक्यांत सांपडलों आहें. गुराच्या डोक्यावर टोंचून क्षत पाडण्याकरितां जसे कावळे रानांत उभे असतात, त्याप्रमाणें मला टोंचून व्यथा करण्यासाठीं कामक्रोधादि शत्रु माझ्या अन्तःकरणांत सज्ज उभे आहेत. ( त्या भयंकर शत्रूंना पाहून माझा थरकांपच होतो; आणि तो होणारच, कारण, ) बेडकाला साप काळस्वरूप कसे होणार नाहींत ?

**टिप्पणी**—' कळी '=पापाचें मूळ, दुर्बुद्धीचें पिशाच, सैतान. ' दावा '=दुष्टावा, वैर, शत्रुत्व. ' अ+विशुद्ध '=नाहीं अत्यन्त शुद्ध असा, पापी, मलिन. ' शलभ '=टोळ. ' दाव+अनळ '=वन+अग्नि, वणवा. ' व्रणार्थ ' =व्रणासाठीं, जखम करण्याकरितां. ' काक+से '=कावळ्यासारखे. अन्वय—' पशूच्या शिरावरी व्रणार्थ वनीं काकसे स्मरादि रिपु व्रणार्थ मन्मनीं उभे ( असतात ). स्मर+आदिः=स्मर (=काम ) आहे आदि ( पुढारी, आघाडीचा गडी ) ज्यांचा ते, कामक्रोध वगैरे सहा घातक मनोविकार. ' अहि '=साप. ' भेका = बेडकाला. ' काळ '= यम, अंतक, काळासारखे प्राणघातक.

( २२ )

तरेन तुमच्या बळें, भवमहानदीनाविका !
तुम्हीच मग आतरास्तव मला सुदीना विका;

**असे विदित वासही मज सदाश्रमींचा, करा**
**दया, गुण पहा; सवे मज सदा श्रमीं चाकरा.**

**अर्थ**—( मी जरी असा कामादि सहा शत्रूंच्या भीतीनें गांगरलेला आहें, तरी, ) हे संसाररूपी अफाट नदींतील नावाड्या परमेश्वरा! तुमच्या आधारानें मी (संसारनदीपार) तरून जाईन, आणि मग या भिकाऱ्याचा उताराच्या रकमेकरितां तुम्हीच विक्रा करून टाका.( मी जरी निर्धन भिकारी आहें, तरी माझ्या गुणानें मला किंमत येईल. ) मला सज्जनाच्या घरांत राहून कसें वावरावें हें ठाऊक आहे. माझ्यावर दया करा व माझ्या गुणांचा अनुभव घ्या. मला—नोकराला—कष्ट करण्याची नेहमींचीच संवय आहे. ( तेव्हां माझ्याकडून कामचुकारपणा कधींही होणार नाहीं. )

**टिप्पणी**—' भव-महा-नदी-नाविक '=संसार+मोठी+नदी+नावाडी, तऱ्या; संसाररूपी प्रचंड नदींतील तऱ्या. ' आतर '+उतार, नदीपार नेण्याबद्दलचें भाडें. 'सत्+आश्रम '=सज्जन+घर. येथें पंतांनीं आपले यजमान बाबूजी जोशी नाईक, बारामतीकर, यांच्या घराण्यांतील उत्तम रीतरिवाजावर कटाक्ष ठेविला आहे, असें वाटतें. बाबूजी नाइकांच्या घरीं मोरोपंत हे पुराणिक म्हणून आश्रितपेशानें राहिले होते, परंतु बाबूजी नाइकांच्या घरांत त्यांचा फार मान होता. 'सवे'=संवय, सराव. ' श्रमीं '=कष्ट करण्यांत.

( २३ )

**धना, परिजना, घरीं तुमचिया उणें कायसें ?**
**न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें;**
**परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती,**
**गुणा न म्हणतां उणाअधिक, आदरें सेविती.**

**अर्थ**—( कदाचित् तुम्ही म्हणाल, कीं, ' मला तुला विकून द्रव्य मिळविण्याची जरूरी नाहीं; व तुझ्या चाकरीचीही गरज नाहीं. '

तुम्ही असें म्हणालां, तर तें कांहीं खोटें नाहीं. कारण, ) तुमच्या घरांत द्रव्याला व सेवकांना काय तोटा आहे ? ( वाटेल तेवढें द्रव्य व लागतील तेवढे सेवक तुमच्या जवळ आहेत ), आणि जो रत्नांचा, सोन्याचा, व पृथ्वीचा स्वामी आहे, त्याला लोखंडाची जोड करून काय लाभ बरें ? ( हेंही खरें. ) परंतु ( आपण ध्यानीं आणा, कीं, ) समर्थ व श्रीमंत लोक झाले, तरी तेही ( लहान मोठ्या ) सर्व वस्तूंना आपल्या सांठ्यास ठेवितात, व ( वस्तूच्या ) गुणाला कमीअधिक न म्हणतां तिचा आस्थेनें स्वीकार करितात.

**टिप्पणी**—' परिजन '=सेवक, चाकरनोकर. ' कायसें '=कितीसें. ' जोडिल्या आयसें '=मिळविलेल्या लोखंडानें. ' जोडिल्या आयसें लाभ न '=संग्रह केलेल्या लोखंडानें फायदा होत नाहीं, लोखंडाचा संग्रह करण्यांत फायदा नाहीं. ' उणा-अधिक म्हणणें '=तुलना करून चांगलें वाईट ठरविणें, चिकित्सा करणें. ' आदर '= आस्था, मान, आवड.

( २४ )

**दिसें, म्हणुनि शाश्वतप्रकृति रंक मी काय ? हो !**
**प्रसन्न तुमचा बरें मजवरी, प्रभो, पाय हो.**
**क्षण त्यजुनि इंदिराबृहदुरोजसंगा, धरा.**
**शिरीं पद, मिळो सखा सम-सुशील गंगाधरा.**

**अर्थः**—( शिवाय, माझा बावळा दीन चेहरा पाहून तुम्ही मला हीन समजत असाल. पण या देखाव्यानें भ्रमूं नका. ) अहो, मी असा दीन दिसतों म्हणून मी नेहमींच कायमचा भणंग भिकारी राहणार आहें कीं काय ! हे प्रभो, तुमचा पाय माझ्यावर एकदां प्रसाद करूं द्या बरें, ( म्हणजे पहा काय चमत्कार होईल तो ! ) लक्ष्मीच्या

भरदार वक्षःस्थळावरून एक पळभरच तुम्ही आपला पाय काढून माझ्या मस्तकावर ठेवा, कीं तत्क्षणींच त्या गंगाधर शंकराला मी सुशीलानें अगदीं त्याच्याच सारखा असा सोबती लाभेन ! ( शंकरांत व माझ्यांत कोणतेंच अंतर राहणार नाहीं. )

**टिप्पणी:**—'शाश्वतप्रकृति'=निरन्तर टिकणारी स्थिति ज्याची तो, कधींही न बदलणारा, कायमचा. बहु० स० 'रंक'=दीन, भिकारी, भणंग. 'इंदिरा+बृहत्+उरोज+संग'=लक्ष्मी+पुष्ट, भरदार+स्तन+सहवास=रमेच्या भरदार वक्षःस्थलाची संगति. लक्ष्मी शेषशायी नारायणाचे पाय आपल्या वक्षःस्थळाशीं घेऊन निरन्तर चुरीत असते,या गोष्टीवर येथें कवीचें लक्ष आहे. 'सखा'=मित्र,सोबती. 'समसुशील'=सम ( सारखें ) सुशील ( सुस्वभाव ) ज्याचा तो, सारख्याच सुस्वभावाचा. बहु० स०. 'गंगाधर'= मस्तकावर गंगा धारण करणारा शंकर. नारायणाच्या चरणतीर्थापासून जी गंगा निघाली ती शंकरानें आपल्या शिरीं जटेंत धारण केली आहे. आतां कवि म्हणतो, कीं, 'हे नारायणा, तूं जर आपला पाय माझ्या मस्तकीं ठेविलास, तर तुझें चरणतीर्थ माझ्या मस्तकीं पडून मला गंगाधर शंकराचीच योग्यता येणार नाहीं काय? मग मी हल्लीं जरी दीन दिसतों, तरी कायमचाच दीन आहें, असें कसें म्हणतां येईल ?

( २५ )

**"प्रभुस्तुति न ठाउकी, परि तिच्या महाकामुका**
**मला कृपण मारितो बहु सकाम हाका मुका,"**
**म्हणां मनिं असें; कसें प्रथम नीट ये लेंकरा ?**
**हळूहळु पटु स्वयें सुपथिं लावियेलें करा.**

**अर्थ**—( मी आतांपर्यन्त जें बोललों, ती खरी स्तुति नाहीं, तर कांहीं तरी बखवा आहे, असें तुम्हांस वाटत असेल, व ) तुम्ही मनांत म्हणत असाल, कीं, "याला थोरामोठ्याचें स्तवन कसें करावें तें ठाऊक नाहीं, परंतु मला स्तुतिप्रिय पाहून, हा एक दुबळा, अनाथ, बोबडा जीव, माझी स्तुति करण्याची मोठी हांव मनांत

धरून माझ्या नांवानें कशा तरी किंकाळ्या फोडीत आहे." ( तुमचें हें म्हणणें खरें आहे, हें मी कबूल करितों, परंतु ) लहान मुलाला एकदम पहिल्याप्रथमच कोणतेंही काम ) नीट कसें करतां येईल ?. त्याला तुह्मी स्वतःच थोडथोडें शिकवून हुशार करा व चांगल्या पद्धतीचा माहीतगार करा. ( ह्मणजे मग हाच उत्तम स्तुतिगायक होईल. )

**टिप्पणीः**—'कामुक'=इच्छा (=काम, कामना ) धरणारा, आवड असलेला: तिचा महा+कामुक'=तिचा ह्म०स्तुतीचा ज्याला मोठा शौक आहे असा, स्तवनाचा अतिशौकी. 'कृपण'=दुर्बळ, असमर्थ. 'सकाम'=हौस धरणारा. 'मुका' ज्याला नीट बोलता येत नाहीं असा, बोबडा, मोना. शेवटच्या दीड चरणाचा अन्वयः— 'लेंकरा प्रथमाचि नीट कसें ये ? ( त्याला ) स्वयें हळु हळू पटु(=हुशार ) करा,(आणि) सुपथीं ( उत्तम मार्गांत, पद्धतींत ) लावियेलें (=लाविलेलें, सरतें केलेलें ) ( करा ).

( २६ )

**जनीं तरि असें असे, शिशुहि जे मुखें वर्ण वी,**
**पिता पिउनि ते भुले, मधुरता सुखें वर्णवी;**
**मना जरि न ये, गुरूक्तहि म्हणे 'कटु' प्रायशा;**
**दयानिधि ! तुम्हांपुढें जनकथा अशा कायशा ?**

**अर्थ**—लोकांत सामान्यतः असा प्रकार आढळतो, कीं, लहान मूलसुद्धां तोंडानें जीं ('बाबा, पापा, मामा,' इत्यादि बोबडीं व वेडीं-वांकडीं ) अक्षरें उच्चारितें, तीं मोठ्या उत्सुकतेनें ऐकून बाप मोहून जातो, व ( त्या अर्धवट अक्षरांच्या ) गोडीचें कौतुक इतरांकडूनही आनंदानें करवितो ! ( उलट पक्षीं असा चमत्कार आढळतो, कीं, ) प्रत्यक्ष वडिलांचें बोलणेंही जर आपल्या मनाला रुचलें नाहीं, तर ( मुलगा ) त्या वडिलांच्या बोलण्याला 'कडू' म्हणण्यासही बहुत-करून मागें करीत नाहीं ! ( एकंदरींत, माणसांच्या आवडी—नावडीचा

प्रकार असा आहे. ) परंतु, हे दयासागरा नारायणा, या सामान्य लोकांच्या कथांची तुमच्यापुढें काय किंमत आहे? ( त्यांना काडीचीही किंमत नाहीं, कारण त्या तुम्हांला मुळींच लागू नाहींत. )

**टिप्पणी**—' वर्ण '=अक्षरें. ' पिउनि '=कानानें सेवून, उत्सुकतेनें ऐकून. ' वर्णवी '=वर्णवितो, इतरांकडून कौतुक करवितो. ' मना येणें '=आवडणें, रुचणें, पसंत पडणें. ' गुरु+उक्त '=वडिल+भाषित (=भाषण ), वडिलांचें बोलणें. 'प्रायशा'= प्रायशः, प्रायः, प्राया, बहुतकरून. 'कायशा'=किती किंमतीच्या. " नावडतीचें मीठ आळणी " ह्या म्हणीप्रमाणें सामान्य लोकांच्या आवडी-नावडीची रीत असते, असा या केकेचा इत्यर्थ आहे.

( २७ )

**' अतर्क्य महिमा तुझा, गुणहि फार, ' बा, हें विधी**
**श्रुतिज्ञहि म्हणे सदा, स्तविल आमुचीं केंवि धी ?**
**तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती;**
**स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती ?**

**अर्थ**—हे सख्या नारायणा, ' तुझा मोठेपणा अचिन्त्य व अगाध आहे, तुझे गुण असंख्य आहेत, ' असें वेदाचें मर्म जाणणारा ब्रह्मदेवही म्हणतो; मग आम्हा मानवांची ( कोती व बोबडी ) वाणी त्या महिम्याची व त्या गुणांची यथास्थित स्तुति कशी करणार? परंतु ( भाविक ) लोक आपल्या बुद्धिसामर्थ्यानुसार बरींवाईट स्तोत्रें रचून, आपल्या मनाची तळमळ शांतवून, शुद्ध होतात. तुमच्या ( महिम्याच्या व गुणांच्या ) यथार्थ स्तुति गुंफण्याकरितां, ( महिम्यांत व गुणांत ) अगदीं तुमच्याच तोलाचे कवि कधीं बरें जन्मास येतील ? ( कधींच नाहीं, कारण मानव जोंपर्यंत मानव आहे, तोंपर्यंत परमेश्वराचें पूर्णत्व त्याच्या अंगीं येणार तरी कसें ? कवि कितीही प्रतिभासंपन्न झाला,

तरी त्याची प्रतिभा तुमच्या समग्र महिम्याला व गणांना आकळूंच शकणार नाहीं. तेव्हां आम्हां हीनगुण मानवांच्या तोंडून आपली पूर्ण व यथार्थ स्तुति झाली पाहिजे, अशी आपण अपेक्षाच करूं नका.)

**टिप्पणी**—'अतर्क्य'=ज्याच्याबद्दल तर्कही करितां येत नाहीं असा, अचिन्त्य, अगाध. 'विधि'=ब्रह्मदेव. 'श्रुति+ज्ञ'=वेदवेत्ता, भागवतांत 'ब्रम्हस्तुति' नांवाचें प्रकरण आहे. त्यांत ब्रम्हदेवानें नारायणाचा पूर्णावतार जो कृष्ण त्याची स्तुति केली आहे. 'धी'=बुद्धि, मति. 'यथामति'=आपल्या बुद्धिसामर्थ्याच्या मानानें. 'सन्मति जाहले'=मनाला शुद्ध करिते झाले.

(२८)

**निजस्तुति तुम्हां रुचे; स्तविति त्यां वरें तर्पितां,**
**नमस्कृतिपरां बरें स्वधन सर्वही अर्पितां;**
**स्वभाव तुमचा असा विदित जाहला याचकां;**
**करूं स्तव जसातसा; फळ नव्हे जना याच कां ?**

**अर्थ**—तुम्हांला ( भक्तांनीं भोळ्या भावानें केलेली ) आपली स्तुति आवडते, आणि अशी स्तुति करणाऱ्यांना तुम्ही वर देऊन संतुष्ट करितां, व नम्र झालेल्या दासांना आपलें सर्वस्वही देऊन टाकितां. हा तुमचा उदार स्वभाव ( आमच्यासारख्या सर्व ) मागणेकऱ्यांमध्यें जगजाहीर झाला आहे. म्हणून तर आम्ही जशीं साधतील, तशीं तुमचीं स्तोत्रें गात असतों. मग ( इतरांच्या कशाबशा स्तुतींनीं प्रसन्न होऊन जर तुम्हीं त्यांच्यावर कृपा केलीत, तर ) या मलाच मात्र ( मी केलेल्या यथामति स्तुतीचें ) फळ कां मिळूं नये ?

**टिप्पणी**—'नमस्कृति+पर'=नमस्कार करणारे, नम्र झालेले. 'जसातसा'= कसाबसा, साधेल तसा, यथामति.

( २९ )

**तुम्ही परम चांगले बहुसमर्थ दाते असे;**
**सुदीन जन मी तुम्हां शरण आजि आलों असें;**
**पुन्हाहि कथितों बरें श्रवण हें करायास्तव;**
**समक्ष किति आपला, सकललोकराया! स्तव?**

**अर्थ**–देवा, तुम्ही, मीं आतांच सांगितल्याप्रमाणें, अतिशय गोड स्वभावाचे व फार श्रीमंत दाते आहां; मी, एक अत्यन्त गरीब व अनाथ जीव, तुम्हांला शरण आलेला आहें. हें तुम्हीं चांगलें ऐकून ध्यावें, म्हणून ( एकदा सांगितलें असतां ) पुन्हाही सांगत आहें. हे ब्रह्माण्डनायका! याच्याहून अधिक स्तुति मी तुमच्याच तोंडावर काय करावी?

**टिप्पणी**–'चांगले व समर्थ दाते'=दातेपणा अंगीं येण्याला दोन गोष्टींची आवश्यकता असते, एक दयाळू व गोडा स्वभाव, व दुसरी, द्रव्यसंपत्तीचें बळ. यांपैकीं कोणतीही एक गोष्ट नसेल अगर उण्या प्रमाणांत असेल, तर दातृत्व गुणाचाही अभाव होईल किंवा त्यास कमतरता येईल. दयाळू पण निर्धन व दुबळा मनुष्य खरा दाता होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणेंच सधन व समर्थ मनुष्यही निर्दय असल्यास त्याच्या हातून दान सुटत नाहीं. 'समक्ष'=तोंडावर, डोळ्यांदेखत.

( ३० )

**किती श्रवण झांकिती प्रभुहि, काय ते पोळती!**
**पुसाल जरि 'कोण?' ते पदरजीं तुझ्या लोळती;**
**बरें तुजचि सोसवे स्तवन, कृत्तिवासा गरा**
**न पी तरि कसें घडे? हितकरा, दयासागरा!**

**अर्थ**–( तुमच्या तोंडावर तुमची अधिक स्तुति करण्याला मी जरा कचरतों, कारण अशी स्तुति केली असतां ) कांहीं खरोखर मोठ्या

योग्यतेचे पुरुषसुद्धा ( ती स्तुति ऐकूं येऊं नये ह्मणून हातांनीं ) आपले कान झांकून घेतात, जणूं काय ( त्या स्तोत्रानें ) ते होरपळूनच जातात ! तुम्ही कदाचित् विचाराल, कीं, 'असे कोण ?' तर ( मी सांगतों, कीं, ) ते तुमच्याच पदधूळींत लोळतात, ( अहो, ते तुमचेच संतभक्त आहेत ); परंतु आमचें एक मोठेंच सुदैव, कीं, तुम्हांला तरी ( तोंडावर केलेली ) स्तुति आवडते, ( कारण तुम्हांलाही जर ती आवडली नसती, तर मग या स्तुतीची वाट काय झाली असती, आणि पापी जनांचा उद्धार तरी कसा झाला असता ? ) अहो, विश्वकल्याणकरा, दयासागरा, नारायणा, ( जगताला जाळून टाकणारें हालाहल ) विष जर शंकर पिणार नाहीं, तर काय भयंकर परिणाम होईल बरें ?

**टिप्पणी**–'कृत्तिवासा'=कृत्ति (=व्याघ्रचर्म ) हेंच वासस् (=वस्त्र ) ज्याचें तो, व्याघ्रांबरधारी शंकर. 'गर'=विष. देवदानवांनीं अमृतलाभासाठीं समुद्रमंथन आरंभिलें, तेव्हां प्रथमच त्या मंथनानें हालाहल नांवाचें विष बाहेर आलें, व विश्वाला जाळूं लागलें. परंतु विश्वाचा बचाव करण्यासाठा शंकरानें तें विष स्वतःच गिळून टाकिलें. या कथेवर कटाक्ष ठेवून कवि म्हणतो,"स्तुतीनें साधुसंतांच्याही अंगाला आग लागते. इतर सामान्य जनांवर तर स्तुतीचे फार भयंकर परिणाम घडतात. तेव्हां, विश्वाचें कल्याण करणारे व दयेचे केवळ समुद्र असे जे तुम्ही, ते तुह्मी जर या घातकी स्तुतीला पचविणार नाहीं तर जगाचें कसें होईल ? हालाहल विषाला जर शंकर गिळून टाकणार नाहीं, तर जग जळून खाक झाल्याशिवाय राहील काय ?

( ३१ )

**गमो मधुर हें विष 'स्तवन,' सेवितां माजवी,**
**करी मलिन सद्यशोमुख, हलाहला लाजवी;**
**हरापरिस तूं बरा, प्रभुवरा, सदा जो पिशी**
**असा रस, समर्पित्या अमृत आपुलें ओपिशी.**

अर्थः—हें 'स्तवन' नांवाचें विष (कानानें पितांना) जरी गोड लागलें, तरी तें प्याल्याबरोबर मद उत्पन्न करितें, सत्कीर्तीच्या तोंडाला काळोखा फासतें, आणि आपल्या घातक गुणांनीं (शंकरानें पचविलेल्या भयंकर) हालाहल विषालाही खालीं पाहावयास लावतें; म्हणून, हे नारायणा, अशा या 'स्तवन' नांवाच्या अद्भुत विषाला नेहमीं पिऊन टाकणारा तूं त्या शंकरापेक्षांही समर्थ खरा; आणि (विशेष चमत्कार हा, कीं,) जो कोणी तुला हा असला स्तवनरस अर्पण करितो, त्याला तूं याच्या मोबदल्यांत आपल्या संग्रहींचें अमृत (सुधारस, पक्षीं मोक्ष) देतोस!

**टिप्पणी**—'मधुर गमो'=जरी मधुर वाटलें. 'सत्+यशस्+मुख'=सत्कीर्तीचें तोंड. 'लाजवी'=वरचढ गुण दाखवून शरमिंधें करित, उणेपणा आणतें. 'हरापरिस'=शंकरापेक्षां अधिक. येथें 'अमृत' शब्दावर श्लेष आहे. भक्त देवाला स्तवनरूपी विषरस देतात आणि देव त्यांना उलट गोड सुधारस देतो, हा दिखाऊ चमत्कारपूर्ण अर्थ; परंतु, भक्त ईश्वराची भक्ति करून अमृत म्ह० मोक्ष मिळवितात, हा साधा इंगितार्थ. 'समर्पित्या'=देणाऱ्याला.

(३२)

**कवीश्वरमनःपयोनिधिसुता स्तुतीच्या पते!**
**भले न वरिती स्तुतीप्रति, न जोडिती पाप ते,**
**गळां पडति ज्यांचिया तव गुणैकदेशभ्रमें,**
**तिहीं तुजचि दावितां, भजति, बा, तुला संभ्रमें.**

अर्थ—क्षीरसागरांतून उपजलेल्या लक्ष्मीचा जसा तूं पति आहेस, तसाच कविवर्यांच्या मनांतून उपजलेल्या स्तुतीचाही पती असणाऱ्या परमेश्वरा, सज्जन साधुसंत या स्तुतीचा स्वीकार करीत नाहींत; कारण, (तसें करण्यांत पाप आहे, आणि) ते कधींही पापाचरण करीत नाहींत. देवा, साधुसंतांच्या अंगीं (दयाक्षमाशांति इत्यादि)

कांहीं गुण हुबेहूब तुमच्या गुणांसारखे असल्यामुळें साधुसंत म्हणजे तुम्हीच असा भास उत्पन्न होऊन, ही स्तुति ज्या साधुसंतांना गळामिठी घालायला जाते, त्यांनीं तुझ्याचकडे बोट दाखविल्यावर मात्र ( आपल्या विलक्षण चुकीनें शरमून ) घाईघाईनें ती तुझ्या सेवेला लागते.

**टिप्पणी**—' कवि+ईश्वर+मनः+पयः+निधि+सुता '=कवि+श्रेष्ठ+चित्त+क्षीर+सागर+कन्या+स्तुति=कवीश्वरांचें मन हाच पयोनिधि त्याची सुता ( म्हणजे त्यापासून उत्पन्न झालेली ) क्षीरसागराची मुलगी लक्ष्मी, तशी कविवर्यांच्या मनाची मुलगी 'स्तुति.' तेव्हां कवी म्हणतो, "देवा, तूं जसा त्या लक्ष्मीचा पति आहेस, तसा स्तुतीचाही पति आहेस. लक्ष्मी जशी खास तुझ्या वांट्याची, तशी स्तुतिही तुझ्याच वांट्याची." 'तव गुणैकदेशभ्रमें'=तव गुण+एकदेश+भ्रमें=तुझ्या गुणांच्या कांहीं अंशानें उत्पन्न झालेल्या भ्रमानें ; तुझ्या गुणांपैकीं कांहीं गुण दिसल्यामुळें ( तूंच हा आहेस असा ) भ्रम उत्पन्न झाला, त्या भ्रमानें. 'एकदेश'=एक भाग, कांहींसा भाग, येथें 'तव' या षष्ठीचा संबंध 'गुणैकदेशभ्रमें' या सामासिक शब्दांपैकीं 'गुणैकदेश' इतक्याच गौण भागाबरोबर लावण्याचा आहे. अशा संबंधाला 'एकदेशी अन्वय' असें म्हणतात. वास्तविक ह्मटलें ह्मणजे समासाबाहेरील स्वतंत्र पदाचा सामासिक शब्दांतील प्रधान पदाशीं अन्वय होणें इष्ट असतें. 'संभ्रम'=गोंधळ, धांदल, तारांबळ 'पडती', व 'भजती हीं 'पडते' व भजते, या शब्दांचीं देसोरीं ह्म० प्रांतिक रूपान्तरें आहेत; ह्मणजे तीं तृतीयपुरुषी एकवचनी रूपें आहेत, अनेकवचनी नाहींत.

(३३)

**म्हणोनि कवितासुता तुज समर्पितों साजरी;**
**नसे बहुतशी गुणी, कनकपीतवासा! जरी,**
**तरी न इतरा वरी; हरि! करीं इला किंकरी,**
**मयूरहि निजात्मजाग्रहविमुक्त, जैसा करी.**

**अर्थ**—या कारणास्तव मी आपली ही सजवलेली कवितारूपी मुलगी तुला अर्पण करीत आहें. हे पीतांबरधारी ( वैभवसंपन्न ) देवा, जरी

हिच्या अंगीं फारसे गुण नाहींत, तरी ही दुसऱ्या कोणालाही वरण्याचें कबूल करीत नाहीं; ह्मणून, हे हरे, तूं हिला आपली दासी कर, आणि त्या प्रसिद्ध गजेन्द्र नांवाच्या हत्तीला जसा तूं मगरापासून मुक्त केलास, तसा मला मोरोपंतालाही या मुलीच्या ( तुलाच वरण्याच्या ) आग्रहापासून मुक्त कर.

**टिप्पणीः**—' साजरी '=सजविलेली ' कनक+पीत+वास '=सोनें+पिवळें+वस्त्र=कनकासारखें पीत आहे वास ज्याचें, पीतांबरधारी, सोनसळा नेसलेला. बहु० स०. ' किंकरी '=दासी. " ही फारशी गुणसंपन्न नसल्यामुळें तुह्मीं तिला आपली धर्मपत्नी करणें योग्य नाहीं, आणि मी तर्शी गळ तुह्मांला घालीतही नाहीं. तुह्मीं हिला आपल्या जवळ दासीप्रमाणें वागवा, ह्मणजे ती स्वैरवर्तनी होणार नाहीं, आणि माझ्या मागचीही कटकट मिटेल," हा कवीचा भाव. ' मयूर ' मोरोपंत कवि. शेवटच्या चरणांत श्लेषाचा एक विलक्षण प्रकार आहे. ' निजात्मजाग्रहविमुक्त ' हें सामासिक पद ' मयूर ' या नामाचें विशेषण आहे, व त्याचा ' आपल्या मुलीच्या आग्रहांतून सुटलेला ' असा आहे. परंतु या सामासिक शब्दांपैकीं ' ग्रहविमुक्त ' इतकाच भाग स्वतंत्र करून, तो ' करी ' या नामाचें विशेषण करावयाचा आहे. ' ग्रहमुक्त '=नक्रमुक्त, मगरापासून सुटलेला. तेव्हां, एकाच शब्दाचे हे जे दोन अर्थ निरनिराळ्या संदर्भांत साधले आहेत, त्यांना एकदा ' आग्रहमुक्त ' व एकदा ' ग्रहमुक्त ' असा दुहेरी पदच्छेद करावा लागतो. असा निरनिराळा पदच्छेद करून दुहेरी अर्थ साधला असला, ह्मणजे ' सभंगश्लेष ' होतो. तिसऱ्या चरणांतील ' करीं ' या क्रियापदाचा अन्वय असा आहे, ' हिला किंकरी करीं, व मयूर आग्रहविमुक्त करीं, जैसा करी ग्रहविमुक्त ( केलास ). '' ' करी ' ( चरण ४ )—गजेन्द्र नांवाचा हत्ती. मागें केका ६ वी पहा.

( ३४ )

**स्मरोनि कृत मंतुला, न कवितावधूस्वीकृती**
**कराल, तरि आयका, प्रभु, खराच मी दुष्कृती,**
**नमस्कृतिपुरःसर स्वकृति अर्पितों आजि ती,**
**दिली रविसखें तुम्हां जशि नमोनि सत्राजिती.**

**अर्थ**—मी केलेल्या अपराधाची आठवण ठेवून, जर तुम्ही या कवितासुतेचा स्वीकार करण्याचें नाकारीत असाल, तर मी काय म्हणतों तें, देवा, ऐकून घ्या. मी दुष्ट अपराधी तर खराच, पण जशी ( तुमचा अपराध करणाऱ्या ) सूर्यमित्र सत्राजितानें मोठ्या नम्र भावानें तुम्हांला आपली मुलगी सत्यभामा अर्पण केली, त्याप्रमाणेंच मीही हात जोडून नमस्कारपूर्वक ती आपली कविताकन्या तुम्हांस समर्पीत आहें.

**टिप्पणी**—' मन्तु '=अपराध. ' वधू '=कन्या. ' स्वीकृती '=स्वीकार. ' दुष्कृती '=दुराचारी, दुष्ट क्रिया आचरणारा. ' नमस्कृति+पुरः+सर=नमस्काराला पुढें सरता करून, नमस्कारपूर्वक, आधीं नमस्कार करून. ' रविसख '=सत्राजित, मागें केका ८ वी पहा. कृष्णानें स्यमंतक मण्याचा पत्ता लावून, तो सत्राजितास दिल्यावर, कृष्णावर चोरीचा खोटा आरोप करून त्याचा आपण नाहक छळ केला, म्हणून सत्राजितास पश्चात्ताप झाला, व त्यानें कृष्णाला शरण येऊन त्याला आपली मुलगी सत्यभामा अर्पण केली. ' सत्राजिती '=सत्राजिताची मुलगी, सत्यभामा.

( ३५ )

**' पिता खळ, परंतु ती गुणवती सती चांगली,**
**म्हणोनि मज आपुल्या भजनीं लावणें लागली; '**
**म्हणाल, तरी तत्सुता कशि ? तुम्हांसवें भांडगा**
**अहर्निशिहि भांडला त्रिणवरात्र जो दांडगा.**

**अर्थः**—पण, देवा, तुम्ही म्हणाल, कीं, " बाप ( सत्राजित् ) दुष्ट होता, परंतु त्याची मुलगी सत्यभामा ही गुणी, सद्वर्तनी, व भली होती, म्हणून तिचा स्वीकार करून तिला सेवेला लावणें अवश्य झालें. " यावर मी विचारतों, कीं, ( सत्यभामेची एक गोष्ट बाजूस ठेवा, पण ) जो भांडखोर, हट्टी, घटिंगण तुमच्या बरोबर सत्तावीस दिवस अहोरात्र

झगडला, त्या जांबुवंत आस्वलाची मुलगी (जी तुम्हीं वरलीत ती) कशी होती. तें सांगा पाहूं ? (त्या धसाड्या आस्वलाची ती झिपऱ्यावाली आस्वल जर तुम्हीं स्वीकारलीत, तर या नम्र झालेल्या गरिबाची नीटस कविताकन्या तुम्हांला कोणत्या तोंडानें नाकारितां येईल ? )

**टिप्पणी**—' खळ '=दुष्ट. ' सती '=सद्वर्तनी. ' भांडगा '=भांडकुदळ, भांडखोर. ' तत्सुता '=त्या जांबुवन्ताची मुलगी. ' अहर्निशि '=रात्रंदिवस, अहोरात्र. ' त्रि+णव+रात्र '=तीन+नऊ+रात्रि= ३×९ रात्री, सत्तावीस रात्री, सत्तावीस वार. ' त्रि ' या अक्षरांतील रकारामुळें, संस्कृत भाषानियमानुसार 'न' चा 'ण' झाला आहे. सत्राजिताच्या मण्याचा माग काढीत काढीत कृष्णाला एका खोल अंधाऱ्या गुहेंत जावें लागलें. येथें जांबवान् नांवाचा रामावतारींचा आस्वल अद्याप राहात होता. या जांबवन्तानें तो मणि आपल्या लहान मुलाला खेळण्यास दिला होता. तो मिळविण्याकरितां कृष्णाला त्या गुहेंत जांबवन्ताबरोबर सत्तावीस वार दिवसरात्र कुस्ती खेळावी लागली. अखेर जांबवन्त चीत झाला, आणि त्यानें तो मणी व आपली मुलगी जांबवती, अशीं दोन रत्नें कृष्णाला अर्पण केलीं, व कृष्णानेंही मोठ्या आनंदानें व आदरानें त्या दोहोंचाही स्वीकार केला.

( ३६ )

**तिलाहि बरवी म्हणां, उचित होय, तोषाकरें**
**असेल सजली यथारुचि तयीं स्वयोषा करें;**
**जशी पदरजें शिला; परि असे न हे शापिली-**
**धवें, हरिमनोहराकृति सती अघें व्यापिली.**

**अर्थ**—परंतु कदाचित् त्या जांबवतीलाही तुम्ही 'चांगली' म्हणाल, आणि तें योग्यच म्हणावें लागेल, कारण, ती जांबवती पदरांत घेतल्यावर तुम्हीं तिला आपल्या आनंदाची खाणच अशा कुशल हातानें पाहिजे तशी आपली स्त्री म्हणून सजविली असेल; असें अद्भुत कसब तुमच्या अंगीं आहे, उदाहरणार्थ, दगडाच्या धोंडीची तुम्हीं

आपल्या पायधुळीच्या स्पर्शानें अत्यन्त लावण्यवती स्त्री बनविलीत. परंतु ( ज्या शिलारूप झालेल्या अहल्येचा तुम्हीं उद्धार केला, त्या अहल्येपेक्षां माझी कवितासुता किती तरी चांगली आहे ! ) ती अहल्या जशी पतीनें शापलेली होती, तशी ही माझी कृति कांहीं शापग्रस्त झालेली नाहीं; आणि जशी अहल्या हरीला (=इंद्राला ) मोह पडेल इतकी लावण्यवती होती व तिची गणना सतींच्या (=पतिव्रतांच्या ) मालिकेंत होते, तशीच माझी कृतिही हरीला (=विष्णूला ) मोह पडेल इतक्या सुंदर जडणीची आहे, व तिची गणनाही सतींच्या ( =शुद्ध रचनांच्या ) मालिकेंत होते, तरी पण त्या अहल्येंत व माझ्या कृतींत एक मोठाच फरक आहे, तो हा, कीं, माझी कृति अहल्येप्रमाणें पाप-दोषानें लडबडलेली नाहीं.

**टिप्पणी**—' तोषाकरें करें '=तोषाचा ( आनंदाचा ) आकर (=खाण ) असा हात त्यानें. ' तयीं '=तेव्हां, ( पदरांत घेतली ) ते वेळीं. ' स्व+योषा '=आपली स्त्री. ' स्व+योषा यथारुचि सजली असेल '=आपली स्त्री मनाजोगती नटाविली असेल. ' यथारुचि '=आवडीप्रमाणें. ' धवें '=पतीनें. ' हरि '=(अहल्यापक्षीं ) इंद्र, ( कवितापक्षीं ) विष्णु. इंद्र अहल्येच्या लावण्याला भुलला, व कपट करून त्यानें तिला फसविलें. या भाबडेपणें घडलेल्या पापाबद्दल तिचा पति गौतम यानें तिला ' तूं शिला हो' म्हणून रागाच्या भरांत शाप दिला. परंतु राग शांत झाल्यावर, त्याच्या लक्षांत ही गोष्ट आली, कीं, इंद्राच्या कपटानें जरी ती फसली, तरी ती मनानें निर्मळ पतिव्रताच आहे, तेव्हां त्यानें तिला उच्छाप दिला, कीं, रामचरणाचा स्पर्श झाला म्हणजे तूं पूर्व स्वरूप पुन्हां पावशील. ' अहल्या, द्रौपदी, सीता, तारा, मंदोदरी, ' या पांच महासती म्हणून प्रसिद्ध आहेत.

( ३७ )

**भलें स्मरण जाहलें समयिं; कंसदासी करें**
**कशी उजरली, समुज्ज्वलदयासुधासीकरें ?**

**तुम्हां स्वरिपुची तशी बटिक आवडे, मत्कृती**
**नको, न सजवे, असा बहुत काय मी दुष्कृती ?**

**अर्थ**—महाराज, मला आणखी एका प्रसंगाचें छान वेळेवरच स्मरण झालें आहे. निर्मल दयामृताचे कण ज्यांत आहेत अशा आपल्या हातानें तुम्ही ती कंसाची दासी ( कुब्जा ) शरीरानें नीटस कशी बरें केलीत ? आपल्या शत्रूची तसली कुबडी दासीही तुम्हांला आवडते, आणि माझी काव्यकृती मात्र आवडूं नये, तिला मात्र तुम्ही सजवूं नये ( गोड करून घेऊं नये ), इतका का मी चांडाळ पापी आहें ?

**टिप्पणी**—' उजरणें '= उजू-सरळ-नीटनेटकी करणें. ' कंसदासी '=कुब्जा; ही शरीरानें कुबडी होती. बळराम व कृष्ण जेव्हां मथुरेंत आले, तेव्हां तिनें त्यांना सुगन्धि चंदनाची उटी लाविली, म्हणून प्रसन्न होऊन कृष्णानें तिला आपल्या हस्तस्पर्शानें सरळ व नीटस केली, अशी कथा आहे. ' समुज्ज्वल दया+सुधा+सीकर '=तेजस्वी, निर्मल+करुणा+अमृत+कण=निर्मळ दयामृताचे कण ज्यांत आहेत असा, दयेचा वर्षाव करणारा. हें ' करें ' या नामाचें विशेषण. नामाप्रमाणें या विशेषणाचेंही-तृतीया विभक्तीचें रूप केलें आहे. ' सजवणें '=नटवणें.

( ३८ )

**जशी पृथुकतंदुलप्रसृति, आप्तकामा तशी**
**रुचो कृति; सभाग्य तूं सुनय आप्त कां मातशी ?**
**कण्या विदुरमंदिरीं म्हणति साधु आस्वादिल्या;**
**खरें जरि, कशा तुज प्रभुसि आपुल्या स्वा दिल्या ?**

**अर्थ**—ज्याच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या आहेत अशा तुला सर्वैश्वर्य-संपन्न परमेश्वराला जशी ( त्या सुदाम्याच्या ) पोह्यांच्या कण्यांची मूठ आवडली, तशीच ही माझी कविताकृतीही आवडो. ( आणि तुला ही हीनगुण असली तरी आवडणारच, कारण, ) तूं जरी

श्रीमंत असलास, तरी चांगल्या चालीचा व ( आह्मां भक्तांचा ) सगा-सोयरा आहेस, मग असा माजोरी उद्धटपणा तूं ( आमच्याशीं ) कसा दाखवशील ? असें सांगतात, कीं, विदुराच्या घरीं तुम्हीं कण्यांवर ताव दिलात, हें जर खरें–( आणि तें खरें आहेच )–तर त्या विदुरानें तरी, जो आपला केवळ आत्माच अशा तुला प्रभूला त्या कण्या कशा दिल्या बरें ?

**टिप्पणीः—** ' पृथुक+तंदुल+प्रसृति '=पोह्यांच्या तांदुळांची ओंजळ ' आप्त+काम '=पूर्ण आहेत इच्छा ज्याच्या असा. बहु० स० ईश्वराच्या कोणत्याही इच्छा अपूर्ण असणें शक्यच नाहीं. ' स+भाग्य '=श्रीमंत. ' सु+नय '= चांगला आचार ज्याचा तो, सद्वर्तनी. ' आप्त '=सगासोयरा. सुदामा नांवाचा गरीब ब्राह्मण कृष्णाचा लहानपणचा गुरुबंधु होता. त्यानें भेट ह्मणून आणलेले पोहे कृष्णानें अमृताहूनही गोड म्हणून खाल्ले. विदुर नांवाचा कौरव घराण्यांतील दासीपुत्र कृष्णाचा परम भक्त पण गरीब होता. त्याच्या झोंपडींत कृष्ण आला, तेव्हां त्यानें त्याला कण्यांच्या आंबिलची मेजवानी केली व कृष्णानेंही ती मोठया लाडाकोडानें झोडली ! ' आस्वादणें '= चाखणें, खाणें. ' स्व '=आत्मा, प्रत्यक्ष प्राण, कलिजा.

( ३९ )

**जिणें रस पहावया प्रशिथिलीं रदीं चाविलीं,**
**सुवासहि कळावया प्रथम नासिकीं लाविलीं,**
**तुम्हांसि शबरी तशीं बदरिकाफळें दे; जुनी**
**कथा अशि असो, पहा स्वचरितें तुम्ही मेजुनी.**

**अर्थ—**ज्या शबरीनें बोरांची गोडी पाहण्याकरितां तीं आपल्या ( म्हातारपणामुळें ) हालणाऱ्या दांतांनीं चावून पाहिलीं आणि त्याना चांगला वास येत आहे कीं नाहीं हें जाणण्याकरितां तीं नाकाला लावून हुंगलीं, ती शबरी तसलीं बोरें तुम्हांला अर्पण करिती झाली,

( आणि तुम्हीं ती आवडीनें चाखलींतही, ) पण ही जुनी गोष्ट आतां पुरे झाली. तुम्हीच आपल्या चरित्राचें सिंहावलोकन करून पहा, ( म्हणजे असले दाखले किती तरी आढळतील. )

**टिप्पणी**—' प्र+शिथिल ' = फार सैल, डळडळ हलणारे. हें ' रद ' नामाचें विशेषण. ' रद '=दांत. ' शबरी '= भिल्लीण. राम व लक्ष्मण हे जेव्हां वनवासास गेले, तेव्हां एका भिल्लीनें त्यांना मोठ्या प्रेमादरानें हुंगून, गोडी पारखण्यासाठीं चावलेलीं बोरें उपाहाराकरितां अर्पण कलीं व तीं त्यांनींही तितक्याच प्रेमादरानें खाऊन त्या भिल्लीणीच्या जन्माचें सार्थक केलें, अशी कथा रामचरित्रांत आहे. ' मेजणें ' = मोजणें,गणणें.

( ४० )

**प्रभो ! शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे,**
**म्हणोनि इतुकेंचि हें स्वहितकृत्य जीवांकडे;**
**प्रसाद करितां नसे पळ विलंब, बापा, खरें;**
**घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें.**

**अर्थ**—हे प्रभुराया, तुम्हांला कोणीही भक्त एकदां नम्र भावानें शरण आला, म्हणजे तुम्हीं त्याला कधींही प्रतिकूळ होत नाहीं. तेव्हां आम्हां मानवांनीं आपल्या कल्याणाचें कृत्य करावयाचें म्हणजे तुम्हांला नम्र भावानें शरण यावयाचें, इतकेंच होय. कोणावरही कृपा करण्याला तुम्हांला पळाचाही अवकाश लागत नाहीं, ही गोष्ट खरी, परंतु चातक पक्ष्यानें जर आपली चोंचच उघडली नाहीं तर तींत पावसाचें पाणी पडणार नाहींच. ( त्याप्रमाणेंच तुम्हीं दयाळू दाते आहां व कृपा करण्यास तुम्हांला एका निमिषाचाही अवकाश लागत नाहीं, हें जरी सर्व खरें आहे, तरी तुमचा कृपायोग घडण्याला, आम्हीं आधीं तुम्हांला शरण आलेंच पाहिजे, त्यावांचून कांहींच होणार नाहीं. )

**टिप्पणी**—' पांखरें '= पाखरानें, चातकपक्ष्यानें. मागें केका पहा. २०

(४१)

**शिवे न तुझिया पदा अदयताख्य दोष क्षण;**
**प्रभो, चुकतसों, तरी करिसि तूंचि संरक्षण;**
**नसेचि शरणागती घडलि सत्य अद्यापि ती;**
**रुचे विषय; ज्यां मिळे अमृत, ते न मद्या पिती.**

अर्थ—देवा, तुमच्या ( दयाळू ) चरणाला ‘ निर्दयपणा ’ नांवाचा दोष कधींही लागत नाहीं. आम्हीं मानव चुका करितों (व त्या चुकांनीं वास्तविक आमचा घात व्हावयाचा, ) पण तूं मात्र आमचें संरक्षण करतोस. ( मग, मला ज्या अर्थी अजून माझें तारण झालें नाहीं असें वाटत आहे, त्या अर्थी असेंच समजलें पाहिजे, कीं,) मी अद्याप खऱ्या भावानें तुला शरणच आलों नाहीं, (कारण) अजून ऐहिक सुखाची गोडी आहेच; आणि ज्यांना खऱ्या अमृताचा लाभ झाला असेल, ते दारूला कधींही घशांत ओतणार नाहींत. ( आम्ही जर तुला शरण येऊन तुझ्या कृपेचा गोड व शाश्वत आनंद चाखला असता, तर हीन व मादक लौकिक सुखाचा मोह आम्हांला पडलाच नसता. )

**टिप्पणी**—‘ अदयताख्य दोष ’=अदयता ज्याची आख्या (=संज्ञा, नांव) तो दोष, निर्दयपणाचा विटाळ. ‘ शरण+आगति ’=शरण येणें.

(४२)

**विपाक न गणोनि, म्यां प्रकट आपुल्या घातकें**
**कळोनि अमितें बळें विविध जोडिलीं पातकें;**
**‘ क्षमस्व भगवन्नजामिलसखोऽस्मि ’ ऐसें तुला**
**म्हणें नमुनियां सुदुस्तरविपन्नदीसेतुला.**

**अर्थ**—परिणामाकडे यत्किंचित् लक्ष्य न देतां म्यां उघडउघड आत्मघातक्यानें जाणूनबुजून मुद्दाम नाना प्रकारचीं असंख्य पापकृत्यें आचरलीं आहेत. तेव्हां आतां, अत्यन्त दुर्लंघ्य दुःखनदीवरील ( आलीकडून पलीकडे जाण्याचा ) जो पूलच अशा तुला मी शरण येऊन म्हणतों, "हे भगवन्ता, मी ( पापाचरणांत ) त्या अजामिळाचाच सोबती आहें; ( पण मलाही अजामिलाप्रमाणेंच ) क्षमा कर."

**टिप्पणी**—' विपाक '=परिणाम. ' ' आपुला घातक '=आत्मघातकी, आत्महत्यारा. ' कळोनी'=कळत असतां, जाणूनबुजून. 'बळें'=मुद्दाम, 'अमित'=असंख्य., ' विविध '=नानाप्रकारचीं. ' क्षमस्व, भगवन्, अजामिलसखः अस्मि ' [ संस्कृत वाक्य ]=' क्षमा कर, भगवन्ता ! अजामिळाचा सखा (=मित्र, सोबती, समशील ) मी आहें ! ' सु+दुस्तर+विपद्+नदी+सेतु '=अत्यन्त+तरण्यास कठिण, दुर्लंघ्य+दुःख+नदी+पूल. ' अजामिळ '—मागें केका २ पहा.

( ४३ )

**नव्हे अनृत, सत्य, तें, अचल ऊचलीला करें**
**तुवां हरिमदापहें, बृहदुदारलीलाकरें;**
**समुद्धरासि एकटा जरि जडासि या कर्दमीं,**
**म्हणेन भुवनत्रयीं तरि तुला 'भला मर्द' मी.**

**अर्थ**—इंद्राचा गर्व हरण करणाऱ्या व अत्यंत उदार कृत्यें आचरणाऱ्या त्वां आपल्या हातानें ( गोवर्धन ) डोंगर उचलून धरिला ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं, खरीच आहे; पण जर या ( मला ) जड पाप्याला तूं (पापाच्या) चिखलांतून वर काढलास, तर मात्र मी तुला ' त्रिभुवनांतील खराखरा मोठा ( एकमेवाद्वितीय ) मर्द' असें म्हणेन.

**टिप्पणी**—' अचल '= डोंगर, पर्वत. गोवर्धन पेलण्याबद्दल मागें केका ५ पहा. ' हरि+मद+अपह '=इंद्र+गर्व+हरण करणारा. ' बृहत्+उदार+लीला+कर '=

मोठीं+औदार्याचीं, अद्भुत दयाळूपणाचीं+कृत्यें+करणारा. हीं 'तुवां' या तृतीयान्त सर्वनामाचीं विशेषणें. 'जड'= पापानें भारावलेला. 'कर्दम'= चिखल, पापाचा रेंदा. 'मर्द'=शूर, वीर.

(४४)

**चिकित्सक 'भला भला' म्हणुनि फार वाखाणिला,**
**जरी बहुजनामयद्रुम समूळही खाणिला,**
**तथापि अतिदुःसहस्वगदशत्रुच्या अत्यया-**
**विना न हृदयीं धरी सरुज पामर प्रत्यया.**

**अर्थ**--(माझा उद्धार तुझ्या हातून झाला, तरच मी तुला 'खरा पराक्रमी मर्द' म्हणावें, नाहीं तर नाहीं, हें अगदींच साहजिक आहे. कारण,) 'मोठा गुणी वैद्य' म्हणून एकाद्याचा फार लौकिक झालेला आहे, आणि त्यानें जरी पुष्कळ रोग्यांच्या रोगवृक्षाचें अगदीं निर्मूळ केलें असलें, तरी जोंपर्यंत त्या वैद्यानें एकाद्या रोग्याच्या अत्यन्त दुःसह रोगशत्रूचा संपूर्ण निरास केला नाहीं, तोंपर्यंत तो बिचारा गांजलेला रोगी व्यक्तिशः तरी त्या वैद्याच्या हातगुणावर विश्वास ठेवणार नाहीं. (अशा गोष्टींत विश्वास बसण्याला स्वतःलाच अनुभव आला पाहिजे, त्याशिवाय इतरांनीं केलेली नांवाजणी मनाला पटावयाची नाहीं.)

**टिप्पणी**—'चिकित्सक'= रोगाची परीक्षा करून औषधयोजना करणारा, वैद्य. 'बहु+जन+अमय+द्रुम'= अनेक+लोक+रोग+वृक्ष. 'खाणणें'= खणून काढणें. 'अति+दुःसह+स्व+गद+शत्रु'= अत्यन्त+सहन करण्यास कठिण+आपला रोग+वैरी. 'अत्यय'= निरास, नाश. 'सरुज'= स+रुज, रोगी. 'पामर'=गांजलेला दीन माणूस. 'प्रत्यय'= विश्वास, भरंवसा.

(४५)

**म्हणा मज उताविळा, गुणचि घेतला, घाबरें**
**असो मन असेंचि, बा भ इंद्र+ सितुघा, बरें;**

**दिसे क्षणिक सर्व हें, भरंवसा घडीचा कसें**
**धरील मन ? आधिनें बहु परिभ्रमे चाकसें.**

**अर्थ**—प्रभो, ( ' माझा उद्धार करा, लवकर करा, ' इत्यादि माझी अधीरपणाची वाणी ऐकून ' ) तुम्ही पाहिजे तर मला उतावळा—घाईखोर—म्हणा, पण, ( ' मला वाटतें ' ) तुम्हीं ह्यांत माझा सद्गुणच सांगितलात, आणि, मोरांना आनंद देणारा जसा मेघ तसा भक्तांना आनंद देणाऱ्या परमेश्वरा, माझें मन ( आपल्या तारणाबद्दल ) असेंच निरन्तर अधीर असो, बरें का ! हा सर्व ऐहिक पसारा व आमचें आयुष्यही क्षणभंगुर दिसत आहे. एका घडीचाही मनाला खात्रीनें विश्वास वाटत नाहीं; हें मन चिंतेनें एकसारखें चाकाप्रमाणें भ्रमण करीत असतें. (मग त्यानें आत्मोद्धारासाठीं उतावळि होऊं नये, तर व्हावें तरी कसें !)

**टिप्पणी**—' भजक + बर्हि + मेघ '= भक्त + मोर + ढग = भजकरूपी बर्हीचा ( मोराचा ) मेघ; मेघ जसा मोरांस, तसा भक्तांस आनंदविणारा व संतोषविणारा. ' क्षणिक ' = क्षणभर टिकणारें, चंचल, क्षणभंगुर. ' आधि '= मानसिक व्यथा, चिंता, काळजी. ' परिभ्रमे '= गरगर फिरतें, भ्रमण करितें.

( ४६ )

**कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली,**
**पुरःसरगदांसवें झगडतां तनू भागली;**
**सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा;**
**न हों जरि उतावळा, स्वरिपु कापितो हा गळा.**

**अर्थ**—यमाच्या सैन्याचें पांढरें निशाणच असें म्हातारपण ( पांढऱ्या रुपेरी केसांच्या रूपानें ) नजरेच्या टप्प्यांत आलें आहे. यमाच्या स्वारीच्या अघाडीचे योद्धेच अशा रोगाबरोबर दोन हात करतां करता

हा थकून गेला आहे. तुझ्याहून ज्याच्या आंगीं अधिक सामर्थ्य आहे असा दुसरा साह्यकारी कोणीच दिसत नाहीं. मग, आतांही जर मी अधीर होऊं नको, तर या माझ्या शत्रूनें गर्दन छाटलीच याची वाट काय?

**टिप्पणी**—' कृतान्त + कटक + अमल + ध्वज + जरा '= यम+सैन्य + पांढरा + बावटा + म्हातारपण. यमराजाची स्वारी जवळ आली, हें खास, कारण म्हातारपणची रुपेरी केसांची झुळूक म्हणजे त्या यमाच्या फौजेची पांढरी ध्वजाच, आणि ती आतां माझ्या नजरेस पडूं लागली आहे. ' पुरः + सर + गद ' = पुढें +सरणारे+ रोग; अघाडीस असणारे रोग, यमाच्या फौजेच्या बिनीचे स्वार असे रोग. ' तनू '= शरीर, देह. ' सहाय '= मदतगार. ' आगळा '= अधिक, वरचढ. न हों = होऊं नये, न व्हावें, न होईन. या केकेवरून पंतांनीं हें काव्य म्हातारपणानें जर्जर झालेल्या स्थितींत लिहिलें, हें उघड आहे.

(४७)

**अवश्य करणें खरें प्रणतरक्षण स्वोचित;**
**उशीर मग कां? बसों कृपण मीहि कां शोचित?**
**नव्हे, प्रभुवरा! तुम्हां उचित एकटें धांवणें;**
**कृतांत शिवला नसे, तंव दिसे बरें पावणें.**

**अर्थ**—देवा, नम्र झालेल्या भक्तांचें रक्षण करणें हें तुमचें उचित कार्य असून तें तुम्हांला केलेंच पाहिजे. मग हा व्यर्थ कालक्षेप कां म्हणून? आणि या मी दीन दुबळ्यानें असें विवळत कण्हत कां रहावें? ( अर्थात्, अतिकाल झाला म्हणजे अगदीं अखेरच्या क्षणीं आपलें अवश्य कर्तव्य पार पाडण्याकरितां ) तुम्हीं ( आपल्या वैभवाला व अधिकाराला योग्य असा सर्व लवाजमा सोडून ) एकटेंदुकटें धांवत सुटणें खास चांगलें नाहीं. तेव्हां जोंपर्यंत यमानें माझ्यावर हात टाकला नाहीं, तोंपर्यंत वेळींच येऊन माझा उद्धार करणें, हेंच बरें दिसतें.

**टिप्पणी**—'स्वोचित '+स्वतःला साजेसें. 'कृपण '=दुबळा, कष्टी. 'शोचित' =दुःख करीत, विव्हळत, तळमळत. 'कृतान्त '=यम. पावणें '=प्रसन्न होणें, किंवा येऊन पोंचणें.

( ४८ )

**'कसें तरि करूं तुझें अवन, पूरवूं आळ जी**
**असेल मनिं; आमुची तुज कशास रे काळजी ?'**
**असें जरि म्हणाल, हो प्रियतमा, जगज्जीवना !**
**तदाश्रितमृगासि ती सुखसमृद्धि, बा, जी वना.**

**अर्थ**—कदाचित् तुम्ही असें म्हणाल, कीं, "कसें तरी तुझें रक्षण करूं व तुझ्या मनींची हौस पुरी करूं. ( तसें करितांना आमची तारांबळ उडेल कीं काय, हें आमचें आम्हीं पाहून घेऊं, ) आमची एवढी काळजी करण्याची तुला रे जरूरी काय ?" पण, आमच्या अत्यंत आवडत्या, विश्वाच्या कलिज्या, प्रभुवरा ! रानाला जी सुख-समृद्धि होते, तीच सुखसमृद्धि त्या रानाचा आश्रय करून राहणाऱ्या प्राण्यासही होतेच. ( आश्रयस्थानाची सुखस्थिति तीच आश्रितांचीही सुखस्थिति; आणि आश्रयदात्याला जें दुःख, तेंच आश्रितांनाही दुःख, हा न्याय उघड आहे. )

**टिप्पणी**—' अवन '=रक्षण. ' आळ '=लळा, लाड, हट्ट, हौस. ' तत्+आश्रित+मृग '=त्याचा+आश्रय घेतलेला+प्राणी; त्या वनाच्या आसऱ्यास राहणारा प्राणी.

( ४९ )

**सुखेंचि सुख बाळका प्रकट होय मातेचिया;**
**तिला घडति जे श्रम, प्रियजनोत्तमा ! तेचि या;**

**म्हणोनि न शिवो पळ-क्षणहि कष्ट, जीवा ! तुला,**
**विपज्जलधिसेतुला, सकललोकजीवातुला.**

**अर्थ**—आईच्या सुखानेंच बालकाला सुखाचा अनुभव येतो; आणि, हे सर्व प्रिय जनांत श्रेष्ठ परमेश्वरा, त्या मातेला जें दुःख होतें, त्याचा स्पर्श तिच्या बालकालाही होतोच. म्हणून, हे आमच्या जीवप्राणा देवा, तुला क्षणमात्रही कष्टाचा स्पर्श न होवो ! तूं तर दुःखसमुद्र तरून जाण्याचा सेतु आणि सर्व लोकांच्या जीवाचा आधार आहेस.

**टिप्पणी**—'विपत्=जलधि+सेतु'=दुःख+समुद्र+पूल; दुःखसागराचा पूल, दुःख तरून जाण्याचें साधन. 'सकळ+लोक+जीवातु'=समग्र लोकांना जीवन देणारा. हीं दोन्हीं 'तुला' या सर्वनामाचीं विशेषणें असून त्या सर्वनामाप्रमाणेंच द्वितीयान्त आहेत. या केकेंत आई व मूल यांचा जो संबंध, तोच परमेश्वर व चराचर जगत् यांचा आहे, हें निरनिराळीं विशेषणें योजून सुचविलें आहे.

(५०)

**असोत तुज आमुचीं सकळ भावुकायुर्बळें;**
**जगोनि बहु काय म्यां सुकृत जोडिलें दुर्बळें ?**
**असें, प्रियतमा ! सुखी बहुतकाळ; मायातमीं—**
**जना सुपथ दाखवीं; मुदित, सत्तमा, यांत मी !**

**अर्थ**—देवा, आम्हां भक्तांचीं सर्व आयुष्यें तुला असोत. कारण, मीं ( आणि माझ्याप्रमाणेंच इतरांनीं ) पुष्कळ दिवस जगून काय पुण्याचे दिवे लावले आहेत ? बा आवडत्या परमेश्वरा, तूं चिरकाळ सुखी अस, आणि या मायेच्या काळोखांत जीवांना योग्य मार्ग दाखव. हे श्रेष्ठा, यांतच मला मोठा आनंद आहे.

**टिप्पणी**—'भावुक+आयुः+बळ'=भक्तांच्या आयुष्याचें बळ, भक्तांचा आयुर्दाय. 'सु+कृत'=चांगलें कृत्य, पुण्य कृत्य—'जोडिलें'=केलें. 'माया+तम'=अज्ञान+काळोख,

अज्ञानानें उत्पन्न होणारा आंधळेपणा, मायेची धुंदी. 'मुदित'=आनंदित. 'सत्+तम' =चांगलें+अतिशयदर्शक प्रत्यय, अत्यन्त चांगला.

( ५१ )

**' भले परिशिले सुरासुरनरीं तसे लक्ष मीं, '**
**म्हणोत म्हणणार, बा; तुज असा नसेल क्षमी;**
**उरीं भृगुपदाहती मिरवितोसि अद्यापि तीं,**
**कवी तव यशःकथा नवसुधानवद्या पिती.**

**अर्थ**—" देव, दैत्य, व मानव, यांमध्यें मीं लाखों व्यक्ति ( शंकर, प्रऱ्हाद, वाल्मीकि, वगैरे ) तशा ( म्हणजे क्षमाशील म्हणून ) ऐकिलेल्या आहेत, " असें जे म्हणणार असतील, ते खुशाल म्हणोत; परंतु माझ्या मतें-तरी, हे देवा, तुझ्यासारखा कोणीही क्षमाशील नाहीं. अजूनसुद्धां तूं आपल्या वक्षःस्थलावर भृगुऋषीच्या लाथेची खूण ( मोठ्या आनंदानें व आदरानें भूषण म्हणून ) मिरवीत असतोस. तुझें हें अपूर्व अमृत-रसासारखें निर्मळ सच्चरित्र कवी अद्याप उत्सुकतेनें सेवन करीत असतात ( म्हणजे गात असतात ).

**टिप्पणी**—'तसे=त्या प्रकारचे, तसले. क्षमी=क्षमावन्त, क्षमाशील. ' भृगु+पद+आहति '=ऋषिनाम+पाय+तडाखा, भृगूच्या पायाची लाथ. ' नव+सुधा+अनवद्या '=ताजा, अपूर्व+अमृतरस+शुद्ध, स्वच्छ, निर्मळ; ताज्या ( किंवा अपूर्व ) अमृताप्रमाणें निर्मळ. हें ' यशःकथा ' या नामाचें विशेषण. कथासंदर्भ—एकदा ब्रह्माविष्णुमहेश या तीन देवांत औदार्य, क्षमा, व शांति, या गुणांनीं कोण सर्वश्रेष्ठ आहे, या परीक्षेकरितां भृगूनें प्रथम ब्रह्मदेवाकडे जाऊन त्याला नमस्कार, वंदन, इत्यादि कांहीं केलें नाहीं. तेव्हां ब्रह्मा रागावला. शंकराकडेही तसाच प्रकार घडला. नंतर भृगु वैकुंठास आला. त्या वेळीं नारायण शेषपर्यंकावर झोंपला होता. भृगूनें त्याच्या छातींत लाथ मारिली. नारायण धडपडून उठला, व न रागावतां भृगूचा पाय घेऊन चेपीत चेपीत म्हणाला, " महाराज, आपण आलां

असतां, तुमचें स्वागत न करितां मी निजून राहिलें, हा माझा फारच मोठा अपराध. त्याबद्दल आपण मला शिक्षा केलीत ती योग्यच. परंतु आपला पाय दुखला असेल, तेव्हां तो मला जरासा चेपूं द्या." भृगु संतुष्ट होऊन म्हणाला, " हे नारायणा क्षमाशांति गुणांनीं तूं सर्व देवांत निःसंशय श्रेष्ठ आहेस."

( ५२ )

**" भवन्मतिस आवडे जरि, धनादिकालागिं ते,**
**मदीय गुणकीर्तनश्रवण कां तरी त्यागिते ?"**
**असेंहि म्हणशील, बा, जरि, तरी तुझी मावली**
**तुज त्यजुनि पाजितां, कशि दुधाकडे धांवली.**

अर्थ—देवा, तूं कदाचित् म्हणशील, कीं, " जर मी तुमच्या मनाला खरोखर आवडत असेन, तर मग कनककान्ता इत्यादि ऐहिक विषयांकडे वळून माझ्या चरित्राचें कीर्तनश्रवण करण्याचें मन कां सोडतें ?" या आक्षेपावर आम्हीं असें उलट विचारितों, कीं, तुझीच आई यशोदा तुला अंगावर पाजीत असतांना ( दूध उतास जात आहे असें पाहतांच ) तुला मांडीवरून दूर करून त्या दुधाकडे कशी बरें धांवत गेली? ( तुझ्यापेक्षां दूध तिला जास्ती वाटत होतें, असें यावर भाष्य करणें, योग्य होईल काय ? खास नाहीं. )

**टिप्पणी—**' भवत्+मति '=तुमचें मन. '-लागिं'=साठीं, करितां. ' ते '= ती, मति.

( ५३ )

**अनावर पिशाचिका विषयवासना सत्य, जी**
**असें करवि कृत्य, जी भुलविते, कधीं न त्यजी;**
**म्हणोनि तुज जाणत्या विनवितों, इला काढ, गा !**
**करीन मग, तूं जरी म्हणसि, ' आपणा गाढ गा '**

**अर्थ**—देवा, जी असें वर्तन करविते, मनाला भूल पाडते, व आपली पकड कधींही सोडीत नाहीं, ती ही विषयोपभोगाची इच्छा एक जबरदस्त हडळ आहे, म्हणून, हे ज्ञानसागरा परमेश्वरा, माझी अशी विनवणी आहे, कीं, या हडळीला झाडून टाक; आणि मग तूं जर सांगितलेंस, कीं, 'माझें गुणकीर्तन एकनिष्ठपणें गा,' तर मी तें तसें खास गाईन.

**टिप्पणी**—'जाणता'=देवर्षि, पंचाक्षरी, मांत्रिक. 'काढणें'=भूताचा संचार नाहींसा करून त्यास झाडास सोडण्यास लावणें.

(५४)

**तुझ्या गुणकथा महासुरभि, त्यांत ही रासभी**
**शिरे विषयवासना; जशि शुका अहीरास भी,**
**तशी न इतरांस भी; इस सदंडही हाकिती,**
**तथापि बहु लाथली; मग अदंड मी हा किती ?**

**अर्थ**—देवा, तुझ्या पवित्र चरिताच्या कथा कामधेनूच आहेत, पण त्या कामधेनूंत ही विषयेच्छारूपी गाढवी शिरते. ही जशी एकदा शुकमुनि नांवाच्या गोवळ्याला (गवळ्याला, पक्षीं गो म्हणजे इंद्रियांचें निग्रहण करणाऱ्याला) भ्याली, तशी इतरांना भीत नाहीं. हातांत दंड धारण करणारे (संन्यासी) ही हिला हांकलण्याचा प्रयत्न करितात, परंतु ही त्यांनाही लाथाळून टाकते; मग ज्याच्या हातांत दंडही नाहीं, म्हणजे जो संसारी आहे, संन्यासी नाहीं, त्या माझी तिला काय पर्वा ?

**टिप्पणी**–'महासुरभि'=श्रेष्ठ गाई, कामधेनु. 'रासभी'=गाढवी. 'शुक'–हे मुनि अत्यन्त इंद्रियनिग्रही होते व विषयवासनेचा यांच्यावर यत्किंचित्ही पगडा बसला

नाहीं. प्रत्यक्ष इंद्राच्या रंभेचाहि यांना मोह पडला नाहीं. 'अहीर'=गोवळी, गाई वळणारा किंवा इन्द्रियदमन करणारा. 'स+दंड'=संन्यासी. संन्याश्यांना हातांत दंड धारण करावा लागतो. दंडांच्या संख्येवरून एकदंडी, द्विदंडी, त्रिदंडी, असे संन्याश्यांचे वर्ग पडले आहेत. या केकेंत 'दंड' शब्द श्लिष्ट ( दोन अर्थी ) आहे.

( ५५ )

**खरासुर जसा, तशी विषयवासना हे खरी;**
**हिचा वध करावया तुजचि शक्ति आहे खरी;**
**बकी सुमति, ताटका लघु, न हे भली; लाजशी**
**उगाचि; तशि एक ही, व्रजवनांत लीला जशी.**

**अर्थ**—रामावतारींचा जसा 'खर' नांवाचा दैत्य, त्याप्रमाणेंच ही विषयवासना खरी (=गाढवी ) आहे, आणि हिला मारण्याची फक्त तुला एकट्याला खरी शक्ति आहे. बकी ( =पूतना ) हिच्या मानानें पुष्कळ चांगली. रामावतारींची ताटका राक्षसी खरी पण हिच्या मानानें अगदींच हलकी. ही खरी कांहीं सुधी व सामान्य नाहीं. ( ही स्त्री आहे, हिच्यावर हात कसा टाकावा, असा ) संकोच बाळगण्याचें कांहींच कारण नाहीं. गोकुळामध्यें ( पूतनावधाच्या वगैरे ) तुम्हीं ज्या लीला केल्यात, त्यांतलीच ही एक समजा, म्हणजे झालें.

**टिप्पणी**—'खर'—रामानें दंडकारण्यांत खर व दूषण या नांवाचे दोन भयंकर राक्षस मारिले होते.

( ५६ )

**कसें तरि असो मग; स्वपणरक्षणाकारणें**
**अवश्य शरणागतव्यसन तों स्वयें वारणें;**
**तुम्हां विहित मुख्य हें; न पुसतां करा हो ! खरी—**
**निजोक्ति; खर काय तो अधिक ? संहरा हो खरी.**

अर्थ—बरें, मग हें सर्व राहो. आपलें ब्रीद राखण्याकरितां शरणागताचें संकट स्वतःच दूर करणें, हें तर तुम्हांला अवश्यच आहे. हें तर तुमचें आद्य कर्तव्यच आहे. मग आम्हीं न सांगतांच, तुम्ही आपली प्रतिज्ञा खरी करा कीं ! अहो, त्या खराचा दुष्टपणा काय अधिक होता ? ( मुळींच नाहीं; ही खरीच फार दुष्ट आहे. ) या खरीला निर्दाळाच !

**टिप्पणी**–' विहित '= योग्य कर्तव्य. ' पुसणें '=विचारणें, सांगणें.

( ५७ )

**खरी करितसे कशी तव जनींहि सत्ता, पहा;**
**इचा वध न निंद्य, बा, प्रबळ मूर्त सत्ताप हा;**
**' कथासुरभिचा रस स्वहित, पुष्कळ, स्वादुही, '**
**म्हणे, 'त्यजुनि कां मला निजधना परस्वा, दुहीं ? '**

अर्थः—तुझ्या भक्तांवरही या खरीचा किती जबरदस्त अंमल आहे तो पहा. हिला ठार करणें हें मुळींच दोषास्पद नाहीं, कारण ही साधुजनांना मूर्तिमन्त तापच आहे. ही विषयवासनारूपी खरी म्हणते, " अहो, कथारूपी कामधेनूचा रस ( भक्तिरस, धेनुपक्षीं दुग्धरस ) पुष्टिकारक, विपुल, व गोडही आहे, परंतु मी स्वतः तुमच्या सत्तेची असतां, मला सोडून या तिऱ्हाइताच्या गाईच्या कासेस लागण्यांत काय मतलब आहे ? "

**टिप्पणी**–' मूर्त '=मूर्तिमंत, प्रत्यक्ष, देहधारी. ' सत्+ताप '=साधूंचा ताप ( दुःख, छळ, जाच ) ' निजधन '=आपली सत्तेची वस्तु , ' परस्वा '=दुसऱ्या–परक्याची–वस्तू ' दुहीं '=तुम्हीं दोहावें.

( ५८ )

**कथासुरभि या भल्या स्वजननीहुनी वाटती;**
**शिशूंस जरठांसही निरखितां रसें दाटती;**

**दुहोत भलते सदा तरि न लेशही आटती;**
**स्ववत्समल भक्षिती, परि न सर्वथा बाटती.**

**अर्थ**—देवा, तुझ्या अवतारचरित्राच्या कथारूपी कामधेनु प्रत्यक्ष आईपेक्षांही जास्त प्रेमळ वाटतात, कारण त्या लहानाना तशाच म्हाताऱ्यांनाही पाहून प्रेमरसानें कोंदून येतात. वाटेल त्यांनीं याचें दूध काढावें, तरी रतिमात्रही पान्हा चोरीत नाहींत. या आपल्या भक्तरूपी वांसराचा पापमल खाऊन टाकतात, परंतु तेणेंकरून यांना कधींही बाट लागत नाहीं.

**टिप्पणी**–' दुहोत '=दूध काढोत. कथासुरभी व साध्या गाई यांमधील भेद येथें दाखविला आहे. गाई आपल्या लहान तान्ह्या वासरांना पाहून पान्हवतात, पण आपल्याच मोठ्या वासरांच्या दर्शनानें त्यांना पान्हा फुटत नाहीं. पान्हा चोरणें, संवईच्या माणसांशिवाय इतरांना लाथा झाडणें, वगैरे खोडीही यांना नाहींत. गाई वांसरांचीं अंगें चाटून त्यांना स्वच्छ करितात, परंतु स्वतः मलिन होतात. असाही प्रकार कथासुरभींचा नाहीं.

( ५९ )

**कथांसि उपमा दिली सुरभिची, दिसे नीट ती;**
**परंतु बहुमंद मी, म्हणुनि सच्छ्रुती वीटती;**
**कथा निरुपमा, तयाप्रति पशूपमा शुद्ध तें—**
**नव्हेचि; न विचारिलें बुधजनांसि म्या उद्धतें.**

**अर्थ**—मी तुझ्या कथांना कामधेनूची उपमा दिली, ती नीट जुळल्यासारखी भासते, परंतु मी खरोखर मंदबुद्धि असलों पाहिजे, कारण ही उपमा ऐकून कित्येक सज्जनांच्या कानाला केवळ वीट येत आहे. कारण, कथा वास्तविक अप्रतिम आहेत, त्यांना गाई-

मारख्या जनावराची उपमा देणें कधींही योग्य होणार नाहीं. छे, छे ! म्यां दांडग्यानें ह्या शाहण्या दाण्या लोकांना न विचारतां हें काय भलतेंच अनुचित वर्णन केलें !

**टिप्पणी—**' सत्+श्रुति '=सज्जनांचे कान. ' निः+उपमा '=ज्यांना उपमाच नाहीं अशा, अप्रतिम.

( ६० )

**असेंहि उपदेशिती गुरु रहस्य मंदा, ' रुचे**
**निजस्तव जसातसा, अगुण घे न वंदारुचे.**
**म्हणोनि निगमस्तुता भलतसें तुला वानितों,**
**परंतु हृदयीं महाजनभयास मी मानितों.**

**अर्थ—**( मी या शाहण्यांना विचारलें नाहीं, हा अपराध खराच. पण ) हेच शहाणे गुरु मला मूर्खाला असेंही एक गूढ मर्म सांगतात, कीं, "कशीही कोणी स्तवनभक्ति केली, तरी ती तुला आवडते. तूं वंदन करणाऱ्या भक्ताचे दोष पहात नाहींस." यामुळें, ज्याची प्रत्यक्ष वेदांनीं स्तुति केली आहे अशा तुला मी जसें साधेल तसें स्तवितों; तरी पण मोठे विद्वान् अधिकारी लोक माझ्या स्तुतीला काय नांवें ठेवतील कोणास ठाऊक, अशी मनांत धास्ती वाटल्यावांचून राहत नाहीं.

**टिप्पणी—**' रहस्य '=गूढतत्त्व, मर्म, खुबी, मख्खी. ' वंदारु '= वंदन करणारा भक्त. ' निगम+स्तुत '=वेदांनीं स्तविलेला. भागवतांत ' वेदस्तुति ' नांवाचें एक प्रकरणच आहे.

( ६१ )

**म्हणें—' स्वकृतिच्या उणें किमपि एक वर्णीं न हो;**
**असें तुज कधीं बरें विगतशंक वर्णीन हो ! '—**

**असेचि अशि आवडी, करिशि कां न अत्यादर ?**
**स्वभक्तसुरपादपा ! हरि ! नसेचि सत्या दर**

**अर्थ**—मी नेहमीं म्हणत असतों, कीं, “मी केलेल्या प्रभुस्तोत्रांतील एकाही अक्षरांत कोणताही दोष राहणार नाहीं, अशा प्रकारें तुझें वर्णन निःशंकपणें कधीं बरें वठेल ? अशी खरोखर माझ्या मनाची फार हौस आहे; मग, हे आपल्या भक्ताच्या कल्पतरो, हरे, तूं माझा प्रेमानें बहुमान कां बरें करीत नाहींस ? (असें विचारण्यांत मला तिळमात्रही भय वाटण्याचें कारण नाहीं, कां कीं खऱ्याला कोणाचें भय नाहीं.)

**टिप्पणी**—‘वर्ण’=अक्षर. ‘विगत+शंक’=गेलेली आहे शंका ज्याची, निःसंदेह, निर्भय. ‘स्व+भक्त+सुर+पादप’=आपले+दास+देव+वृक्ष’ निजदासांचा कल्पद्रुम. ‘दर’=उर, भय.

(६२)

**ध्रुव स्तवनिं आवडी धरि, म्हणोनि अत्यादरें**
**तुम्हीं करुनि दाविली, शिवुनि गल्ल, सत्या, दरें;**
**तसें मज करा, करांबुज धरा शिरीं, मावरा !**
**वराभयपरा ! पराक्रमपटो ! मना आंवरा.**

**अर्थ**—ध्रुवबाळानें तुमची स्तुति करण्याची मनापासून खरीखरी आवड धरली, म्हणून ( त्याचा निर्मळ भाव पाहून ) तुम्हींही त्याच्या गालाला आपल्या शंखाचा स्पर्श करून त्याची ती आवड प्रेमळपणानें पुरी केलीत. मलाही तसाच वागवा; हे लक्ष्मीपते, माझ्या मस्तकावर आपला कमलतुल्य हात ठेवा. हे ( भक्तांना ) वर व अभयवचन देणाऱ्या आणि महापराक्रमशाली देवा, माझ्या साशंक व भ्रांतिष्ठ मनाला स्थिर कराच.

**टिप्पणी**—लहान बालक ध्रुव याला देवस्तुति करण्याची अत्यन्त हौस उत्पन्न झाली, परंतु ती स्तुति कशी करावी हें कळेना, तेव्हां नारायणानें त्याचा भोळा भाव ओळखून त्याला दर्शन दिलें व त्याच्या गालाला आपल्या हातांतील शंखाचा स्पर्श करून त्याला उत्तम अस्खलित वाणी दिली, अशी कथा आहे. 'गल्ल'=गाल. अन्वय ( चरण २ )—दरें गल्ल शिवुनी, तुम्ही ( ती आवडी सत्या (=खरी ) करून दाविली ( =दाखविली ). 'करांबुज'=कमलासारखा हात ( कर्मधारय स० ), किंवा हातांतील कमल ( तत्पुरुष स० ) 'मा+वर,=लक्ष्मीपति. 'वर+अभय+पर'=वर आणि अभय देण्यास समर्थ असा, व वरदान आणि अभयदान देण्यांत सज्ज असा.

( ६३ )

**करांबुज असो; नसें उचित त्यास मी पामर;**
**प्रणाम करिती पदाप्रतिहि सन्मती सामर;**
**पदाब्जरजही जगत्त्रयनमस्क्रियाभाजन;**
**प्रसादचतुरा, कसा तरि करा बरा हा जन.**

**अर्थ**—( मी ' करांबुज माझ्या शिरीं धरा, ' असें म्हटलें खरें, पण ) तें करांबुज राहूं द्या, कारण मी गुणहीन जीव त्यास खास पात्र नाहीं. देवादिकांसह मोठमोठे ज्ञानीही तुमच्या चरणावरच वंदन करतात, ( मग मी दीन अज्ञान तुमच्या हस्तस्पर्शाला कसा लायक असणार ? ). तुमच्या चरणींचा एक धूलिकणसुद्धां त्रिलोकीच्या नमस्काराचें स्थान होणारा आहे. पण, हे कृपादान करण्यांत कुशल देवा, कोणत्या तरी उपायानें या दीन पामराला चांगला करा म्हणजे झालें.

**टिप्पणी**—' स+अमर'=देवांसह. हें ' सन्मती ' नामाचें विशेषण. जगत्+त्रय+नमस्क्रिया+भाजन'=भुवन+तिकल+नमस्कार+स्थान, त्रिभुवनानें वंदिलेलें. तिसऱ्या चरणांत ' आहे ' हें क्रियापद अध्याहृत घेऊन, ' भाजन ' हें विधेय विशेषण करावें.

( ६४ )

**तुम्हीं करुनि दाविला ध्रुव कृतार्थ जैसा दरें,**
**तसेंचि जरि योजिलें तुमचिया मनें सादरें,**
**असो; विहित तें करा; परि बरोबरी त्यासवें—**
**नसे उचित; तो महाप्रबळ वंदिजे वासवें.**

**अर्थः**—शंखस्पर्शानें तुम्हीं ध्रुवाला धन्य केलेंत, त्याप्रमाणेंच प्रेमळपणानें मला धन्य करण्याचें मनांत आणिलें असेल, तर तसें करा. जें योग्य वाटेल तें करा; परंतु ध्रुवाच्या पंक्तीला बसण्याची माझी योग्यता मात्र नाहीं. ध्रुव म्हणजे केवढा, त्याचें सामर्थ्य इतकें कीं प्रत्यक्ष इंद्रानेंही त्याला नमन करावें.

**टिप्पणीः**—' कृत+अर्थ'=संपादित कर्तव्य ज्याचें असा, धन्य. ' स+आदर'= आदरपूर्ण, प्रेमळ. हें ' मनें ' नामाचें विशेषण. ' वंदिजे ' ( कर्मणि )=नमस्कारिला जावा. ' वासव '=इंद्र.

( ६५ )

**किती वय, कसें तप प्रखर, काय विश्वास तो ?**
**ध्रुव ध्रुव खरा; स्तवा उचित होय विश्वास तो;**
**कशी तुळितसां तुम्हीं प्रकट मेरुशीं मोहरी ?**
**प्रसाद करितां उणें अधिक नाठवा, हो हरी !**

**अर्थ**—( कारण, विचार करा. ) त्या ध्रुवाचें वय किती लहान पण त्यानें किती कडक तप केलें. आणि त्याची तुमच्यावरील श्रद्धा तरी किती अढळ ! तो ध्रुव नांवाप्रमाणेंच कृतीनेंही खरोखरच ' ध्रुव ' (=निश्चयी) होता. सर्व विश्वानें त्याची स्तुति करावी अशी त्याची योग्यता होती. मग त्या ( ध्रुवासारख्या ) प्रचंड मेरुपर्वताशीं ( माझ्यासारख्या )

एवढ्याशा मोहरीची उघड उघड तुलना करतां तरी कशी? पण, हे हरे, तुम्ही एकदा कृपा करण्याला सज्ज झाला, म्हणजे लहान मोठें पाहण्याची तुह्माला आठवणच राहात नाहीं!

**टिप्पणीः**—'विश्वास' (चरण १)=श्रद्धा, दृढ भरंवसा; (चरण२)=विश्वाला, संपूर्ण जगताला.' तुळणें='बरोबरी करणें, एकपंक्तीला बसविणें. 'प्रकट'=धडधडीत, उघडपणें.

(६६)

**प्रभुत्व तरि हेंच कीं करुनि दे कृपा दान तें,**
**स्वसाम्य यदुपार्जनें मिरविजे स्वपादानतें;**
**प्रसाद मग काय तो, जरि निवारिना लाघवा?**
**कसें दशमुखानुजा विसरलां? अहो राघवा!**

**अर्थ**—पण, महाराज, खरें प्रभुत्व (=थोरपणाचा अधिकार) तर ह्यांतच आहे. कृपा करून असें दान द्यावयाचें, कीं तें दान लाभल्यानें आपल्या चरणीं नम्र झालेल्या याचकानें दात्याच्याच बरोबरीचें व्हावें. ज्या प्रसादानें हलकेपणा—कमीपणा—नाहींसा होत नाहीं, तो प्रसाद तरी कसला? अहो रामावतारी नारायणा, त्या रावणाच्या भावाची—बिभीषणाची—आपल्याला आठवण नाहीं कीं काय? (त्याच्यावर कृपा करून, जसे आपण अयोध्याधीश, तसा त्याला आपण लंकाधीश केलात ना?)

**टिप्पणी**—'स्व+साम्य'=आपली स्वतःची तंतोतंत बरोबरी, स्वतः दात्याचीच योग्यता, (ईश्वर दाता असतांना) ईश्वरत्व, देवत्व. 'यत्+उपार्जनें'=ज्याच्या संपादनानें. 'मिरविजे' (कर्मणि)=मिरवावें.'स्व+पाद+आनत'=आपल्या पायीं नम्र झालेला. 'लाघव'=लघुत्व, कमीपणा, हीनपणा. 'दशमुख+अनुज'=रावणाचा धाकटा भाऊ.

(६७)

**असो वरि कसा तरी, विमल भाव ज्याचा, करा**
**तयावरि दया; पचे वर असाचि द्या चाकरा;**

**वृथाचि गमतें दिलें, बहुहि, जें न दासा जिरे;**
**पुसोनि अधिकार द्या; सुकर तें सदा साजिरें.**

**अर्थ**—बाहेरून दिसण्यांत कसाही असला, तरी ज्याच्या अंतरंगांतील निष्ठा निर्मळ आहे, अशा माझ्यावर कृपा करा, आणि याला, दासाच्या अंगीं लागेल आणि बाधणार नाहीं असाच वर द्या. जें भक्ताला न पचतां त्याच्यांत दोष उत्पन्न करील, असें वरदान पुष्कळ दिलें, तरी तें फुकटच गेलें असें वाटतें. म्हणून माझी योग्यता पहा, आणि त्या योग्यतेला जें झेपेल व शोभेल, असेंच वरदान द्या, ( म्हणजे त्याची कांहीं तरी खरें चीज होईल. )

( ६८ )

**प्रसन्न बहु होतसां, परि कराल हो ! बावरें—**
**शिवापरि वरासवें हृदय, हें न हो बा वरें;**
**असा वृक कृतघ्न हें न कळलें कसें हो हरा ?**
**भला जगविला तुम्हीं भवमहाहिचा मोहरा.**

**अर्थ**—देवा, तुम्ही माझ्यावर पुष्कळ कृपा करण्यास सज्ज झालां आहां, पण पहा बरें, नाहीं तर (आपल्या प्रसादातिशयाच्या भरांत) मला भांबावल्यासारखा करून सोडूं नका. शिवानें आपल्या भक्ताला वर देऊन त्याची वृत्ति उन्मत्त होऊं दिली, त्याप्रमाणें तुमच्या वरानें माझी वृत्ति उन्मत्त न होवो म्हणजे झालें ! हे प्रभो, 'हा भस्मासुर खाल्ल्याघरचे वांसे मोजणारा महादुष्ट आहे, याला भरमसाट वर देणें योग्य नाहीं,' ही गोष्ट वरदात्या शंकराच्या लक्ष्यांत कशी बरें आली नाहीं ? महाराज, सुदैव एवढेंच, कीं, तो संसाररूपी भयंकर

सापाचा मांत्रिक शंकर तुम्हीं मोठ्या शिताफीनें ( त्या दुष्ट भस्मासुराच्या कचाटांतून ) वांचविलात.

**टिप्पणी**—' वृक '=भस्मासुर. प्रसन्न झालेल्या शंकरानें यास वर दिला होता, कीं, ज्याच्या डोकीवर तूं हात ठेवशील, तो भस्म होईल. या वराच्या सामर्थ्यानें उन्मत्त होऊन, कैलासस्वामी होण्याच्या इच्छेनें भस्मासुर शंकराच्या वराचा प्रयोग शंकरावरच करण्याला तयार झाला. या प्रसंगीं नारायणानें मोहनीचें रूप धरून ( कांहीं ठिकाणीं बटुरूप धरून असें आहे ) आपल्या लाघवी भाषणानें भस्मासुराला असा मोहित केला, कीं, तो नाचत बागडत असतां, त्यानें आपल्याच मस्तकावर आपला हात ठेवला, व त्यामुळें त्या दुष्ट दैत्याचें तत्काळ भस्म झालें. ' भव+महा+अहि '= संसाररूपी प्रचंड साप. ' मोहरा '=मोह घालून ताब्यांत आणणारा मांत्रिक, गारुडी.

( ६९ )

**भजे सुदृढनिश्चयें द्विजकुमारक क्षीरधी,**
**तया करिं तुम्हीच द्या. मदनमारक ! क्षीरधी;**
**उदारपण तें बरें, सुखवि जें सुपात्रा सदा;**
**दिलें अमृत पन्नगा, तशि खळीं कृपा त्रासदा.**

**अर्थ**—एका ब्राह्मणाच्या उपमन्युनामक मुलानें दूध मिळविण्याच्या बुद्धीनें अचळ निश्चयपूर्वक तुमची भक्ति केली; आणि, हे मदनांतका शंकरा, त्याला तुम्हीं स्वतःच प्रत्यक्ष दुग्धसमुद्र दिलात. ( हें कांहीं तरी योग्य दान झालें, असें म्हणतां येईल. ) योग्य सुशील दासाला सढळ हातानें दान देऊन त्यास सुखी करणें, हें उचितच म्हटलें पाहिजे. परंतु, सापाला दूध पाजणें, तसें दुष्टावर महाप्रसाद करणें हें संकटालाच कारण होतें.

**टिप्पणी**—'क्षीर+धी' ( चरण १ ) क्षीरबुद्धि, दूध मिळविण्याची उत्कट बुद्धि (=इच्छा ) ज्याला तो ( बहुव्रीहि स० )( चरण २) क्षीराचा निधि, दुग्धसागर. (तत्पुरुष स०) 'मदन+मारक'=शंकरानें आपल्याला मोह घालण्यास आलेल्या प्रत्यक्ष मद-

नाला तृतीय नेत्राच्या अग्नीनें जाळिलें, अशी कथा आहे. ही केका व पुढील ७० वी केका शंकराला उद्देशून आहेत, आणि नारायणस्तोत्रांत ( मंगलाचरण, केका १ ली पहा. ) शंकराची स्तुति येथें मुळींच अयोग्य नाहीं. ७१ व्या केकेंत विष्णु-महेशांत पूर्ण अभेद आहे, असें प्रतिपादिलें आहे. ( मागें केका १ पहा. ) 'पन्नग'= साप. 'त्रास+दा'=त्रास देणारी.

( ७० )

**अतिप्रिय, सुखप्रद, प्रथम तूं मुदंभोद, या—**
**मयूरहृदया, तुझी क्षण विटो न, शंभो ! दया;**
**उदारपण वानिलें; अजि ! गुरूपहासा बळें**
**कसें करिल लेंकरूं ? निपट हें पहा साबळें.**

**अर्थ**—हे शंभो, तूं आनंदरूपी उदकाचा मेघ या मयूराच्या ( मोराच्या, पक्षीं मोरोपंत कवीच्या ) हृदयाला मूळचाच अत्यन्त आवडता व सुखविणारा आहेस, तेव्हां तुझी दया क्षणमात्रही ( माझा ) तिटकारा न करो, ( अशी माझी प्रार्थना आहे ) मी वास्तविक तुझ्या औदार्याचीच स्तुति केली आहे. अहो ! हें लडिवाळ लेंकरूं, जाणून-बुजून मुद्दाम वडिलांची थट्टा कशी बरें करील ? मी केवळ भोळसट, अर्धवट, आहें हें आपण ध्यानीं आणावें.

**टिप्पणी**—'प्रथम'=मूळचा, पहिलाच. 'ते होय हंसगमना पहिलीच आहे,' ( रघुनाथ पंडित, नलाख्यान ) येथेंही 'पहिलीच'=प्रथमपासूनचीच, मूळचीच, असा अर्थ आहे. 'मुद्+अंभोद'=आनंद+घन. 'गुरु+उपहास'=वडिलांची चेष्टा. 'बळें'=मुद्दाम, समजून उमजून. 'निपट'=निव्वळ, केवळ. 'साबळें'=बावळें, भोळें, साधें.

( ७१ )

**तुम्हां हरिहरांत ज्या दिसतसे, दिसो; वास्तव,**
**प्रबुद्ध म्हणती, नसे तिळहि भेद; मी यास्तव—**

**म्हणे मनिं, यथार्थ जें स्वमत वर्णिती शैव तें—**
**न; वैष्णव दुराग्रही, परम मुख्य हीं दैवतें.**

**अर्थ**——तुम्हां हरिहरांत—विष्णु शिवांत—ज्यांना भेद दिसत असेल त्यांना दिसो. परंतु असा रतिभरही वास्तविक भेद नाहीं, असें ज्ञाते म्हणतात. म्हणून मी आपल्या मनांत असें समजतों, कीं, "शैव पंथी आपलें विशिष्ट मत म्हणून पुकारतात, ( कीं विष्णूपेक्षां शिव श्रेष्ठ आहे ), तें बरोबर नाहीं, आणि वैष्णवही ( आपल्या परीनें ) भलताच हट्ट धरून बसतात. हीं दोन्ही दैवतें ( समतोल व सारखींच ) सर्वश्रेष्ठ आहेत.

**टिप्पणी**–' वास्तव '=वस्तुस्थितीस धरून, खरा, सत्य. ' प्रबुद्ध '=चांगले जाणते, श्रेष्ठ ज्ञानी. ' यथार्थ '=अक्षरशः खरें, अगदीं बरोबर.

( ७२ )

**म्हणें क्षण पुरांतक, क्षण मुरांतक; ब्राह्मणा—**
**मला जरि म्हणाल बा ! तरि विशंक लुब्रा म्हणा;**
**तुम्हां शिव, शिवा तुम्ही भजतसां; शुक व्यास हा—**
**सदर्थ वदले; पुरातन कथा, न नव्या, सहा.**

**अर्थ**—देवा, मी एक क्षणीं पुरशत्रूला (=शंकराला ) हांका मारतों, आणि दुसऱ्या क्षणीं मुरशत्रूला (=तुम्हां नारायणाला ) हांका मारतों, म्हणून जर मला ब्राह्मणाला ' लुब्रा ' म्हणण्याचें तुमच्या मनांत आलें असेल, तर तसें बेलाशक म्हणा. शिव तुम्हाला भजतो, आणि तुम्ही शिवाला भजतां; ही खरीखरी गोष्ट शुकव्यासांनीं सांगितली आहे. या गोष्टी पुराणकाळांतीलच आहेत, आधुनिक कादंबऱ्या नाहींत; तेव्हां शांतपणें ऐकून घेणें, तुम्हांस प्राप्तच आहे.

**टिप्पणी**-पुर व मुर या दैत्यांचा शंकरांनीं व विष्णूंनीं अनुक्रमें वध केला, अशी कथा आहे. ' लुब्रा ' =तोंडपुज्या, ' गंगा गये गंगादास, जम्ना गये जम्नादास, ' अशा प्रकारचा स्वार्थसाधु. ' शुक '=भागवताचे वक्ते. ' व्यास '=पुराणाचे कर्ते. ' सत्+अर्थ '= खरी गोष्ट. ' नव्य '=नवीन.

( ७३ )

**तुझाचि अवतार तो सुत पराशराचा; वळे—**
**तदुक्तिस जन; प्रभो, जरि निजेमधें चावळे,**
**तरी, त्रिभुवनेश्वरा, तव विशुद्ध नामावली—**
**मुखीं प्रकट होय, जी करि सुखी जना मावली.**

**अर्थ**—देवा, तो पराशरसुत व्यास म्हणजे प्रत्यक्ष तुझाच अवतार. सर्व लोक त्याचें वचन प्रमाण मानतात. तो व्यास ( तुझा एवढा दृढ भक्त आहे कीं ) झोंपेंत जरी चावळला, तरी, हे त्रैलोक्यनाथा, जी मातेप्रमाणें लोकांना प्रेमानें सांभाळून त्यांस परमार्थप्राप्तीनें सुख करिते ती तुझी पवित्र नामावळीच त्याच्या तोंडास येते.

**टिप्पणी**—' वळणें '=कबूल होणें, प्रमाण मानणें. ' चावळणें '=बरळणें, बेभान स्थितींत बोलणें.

( ७४ )

**तुझें कुशल नाम बा हळु हळू मना आकळी,**
**दुरत्यय असा महाखळहि त्यास भी हा कली;**
**हरि व्यसन पाप हें; बहु कशास? कायाधवा—**
**परि त्वरित भेटवी तुजहि, योगमायाधवा.**

**अर्थ**—हे देवा, तुझें चतुर नाम मनाला हळु हळू—युक्तीनें—आकलन करितें. अनावर महादुष्ट दुर्बुद्धिस्वरूप कलीचा ही तुझ्या नामानें थरकांप होतो. हें तुझें नाम सर्व संकटांचा व पापांचा

निरास करतें, इतकेंच नव्हे, तर योगमायेचा स्वामी जो तूं त्या तुझेंही प्रत्यक्ष दर्शन कयाधूपुत्र प्रऱ्हादाप्रमाणें प्रत्येक नामधारकाला साधून देतें.

**टिप्पणी**—' कुशल '=हितकर. ' दुरत्यय '=झाडून टाकण्यास किंवा ताब्यांत आणण्यास कठीण, अनावर. ' बहु कशास '=फार काय सांगावें ? इतकेंच नव्हे, तर. ' कायाधव '=कयाधूचा मुलगा प्रऱ्हाद. कयाधू ही हिरण्यकशिपूची पत्नी. ' योग-मायाधवा तुज—'योगमाया किंवा मूलप्रकृति ह्मणजे निर्गुण निराकार परब्रह्माला सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा उत्पन्न होऊन, जें तत्त्व त्यानें प्रथम निर्माण केलें, व ज्यामुळें त्या परब्रह्मास ' ईश्वर ' संज्ञा प्राप्त झाली, आणि ज्याच्या साधनानें त्यानें त्रिगुणात्मक विश्व क्रमाक्रमानें अस्तित्वांत आणिलें, तें मूलतत्त्व. हें मायातत्त्व ' ईश्वराच्या ' सामर्थ्यानें अस्तित्वांत आल्यामुळें व तें त्याच्या कह्यांत राहात असल्या-मुळें, ' ईश्वराला ' योगमायेचा पति—ईश—नाथ असें म्हणतात. परब्रह्माचें आद्य सगुण स्वरूप जें ' ईश्वर ' व मोरोपंतांचा आद्य देव ' नारायण ' यांत मुळींच भेद नाहीं. प्रऱ्हादानें नामभक्तीनें नारायणाच्या दर्शनाचा लाभ मिळविला, अशी कथा आहे.

( ७५ )

**तुम्हांसमचि हें गुणें, अणु उणें नसे नाम, हा—**
**दिसे अधिकही, तसा गुण तुला असेना महा;**
**सदैव भलत्यासही सुलभ, आणखी गायका—**
**छळी न, न अधोगति क्षणहि दे, जगन्नायका !**

**अर्थ**—देवा, गुणांमध्यें तुझें नाम तुझ्यासारखेंच आहे, रतिमात्रही कमी नाहीं, किंबहुना, तसेंच म्हटलें तर या नामांत एक अधिक गुणही आहे; तो मोठा गुण तुझ्यांत आढळत नाहीं. हें वाटेल त्याला सहज मिळतें, शिवाय, हे जगन्नायका, हें आपल्या गायकाचा छळ करीत नाहीं किंवा त्याचा क्षणमात्रही अधःपात होऊं देत नाहीं; (परंतु तुम्ही या दोन्ही गोष्टी करितां ).

**टिप्पणी**— अधोगति'=खालच्या दिशेची गति, अधःपात. येथें विष्णूनें बळी-जवळून दान घेऊन त्यास रसातळीं दडपला या कथेवर कटाक्ष आहे. नामपक्षीं 'अधोगति' म्हणजे नरक लोकास जाणें, दुर्गति. ह्रिच्या उलट 'उत्तम गति' किंवा 'परम गति'.

( ७६ )

**छळीं नृप बळी बळी तरिच तो नसे आटला;**
**गमे बहु भला, मला न सकलांसही वाटला;**
**परीक्षक करी, तसें जडहि सोशितें हेमही;**
**न केवळ विरोचनात्मज तरे पदें, हे मही.**

**अर्थ**—( तुम्हीं केलेल्या ) छळांत बळी राजा खरोखर बळी म्हणूनच सर्वस्वीं नष्ट झाला नाहीं. केवळ मलाच नव्हे, तर सर्वांनाही तो बळी फार चांगला वाटला. (पण यांत आश्चर्य कांहीं नाहीं, कारण) सोनेंपारख्यानें ( तापताडनघर्षणादि ) केलेले सर्व हाल जड ( =वजनानें भारी किंवा निर्जीव, पक्षीं बुद्धिमंद ) सोनेंही सहन करतें ( आणि कसास उतरतें; तर मग अजड ( =बुद्धिमान् ) अशा बळीनें सर्व छळ सोसावा व तुमच्या कसोटीस उतरावें, हें योग्यच होय.) शिवाय ( बळीचा छळ करणाऱ्या तुमच्या पावलाच्या स्पर्शानें ) केवळ विरोचन-सुत बळीच नव्हे, तर ही सर्व पृथ्वीही उद्धरली आहे, ( हें विसरता येत नाहीं. )

**टिप्पणी**—'छळीं'=तुम्हीं केलेल्या छळांत. 'आटणें'=नष्ट होणें, किंवा दुसऱ्याच्या पगांत जाणें, हार खाणें. 'हेम'=सोनें.

( ७७ )

**असा न करितां जरी छळ, तरी प्रभो, तो भली—**
**सुकीर्ति कशि पावता; कविसभा जिणें शोभली ?**

पदीं उपजती नदी कशि, कशी त्रिलोकी सती
अशा अतुल मौक्तिकावलिविणें बरी दीसती ?

अर्थ—देवा, तुम्ही जर बळीचा इतका कसून छळ केला नसता, तर त्याला तरी एवढी, शाहण्या लोकांस भूषणास्पद वाटणारी सत्कीर्ति कशी लाभला असती ? आणि तशीच तुमच्या पायांपासून ( सर्व पापक्षालन करणारी ) गंगानदी तरी मग कशी उद्भवती ? व त्या चमत्कार गंगौघाच्या अप्रतीम मोत्याच्या सरानें या त्रिलोकी सुंदरीच्या लावण्यांत भर तरी कशी पडली असती ? ( एकंदरींत, तुम्हीं केलात त्याला ' छळ ' म्हणण्यापेक्षां ' प्रसाद म्हणणेंच यथार्थ आहे. )

**टिप्पणी**—' कवि+सभा '= ज्ञानी+मंडळ, सुज्ञमंडळी. उत्तरार्ध कथासंदर्भ— वामन बटूनें त्रिपादधरणी मोजण्याकरितां जेव्हां एका पावलानें सबंध पृथ्वीतल व्यापून, दुसऱ्या पावलानें अखिल ब्रह्मांड व्यापण्याकरितां तें पाऊल वर उचललें, त्या वेळीं आंगठ्याच्या धक्क्यानें ब्रह्मांडकटाह फुटून त्यांतून, आकाशनदी जी गंगा, तिचा ओघ भूतलावर लोटला, असें वर्णन आढळतें. बळिराजा बलिदान करीत असतां विष्णूनें वरील बटुवेष धारण करून येऊन बळीजवळून त्रिपाद धरणीचा दानसंकल्प मिळविला, आणि नंतर एकाएकीं प्रचंड शरीर धारण करून एकाच पावलानें सर्व पृथ्वी व्यापिली, दुसऱ्या पावलानें सबंध ब्रह्मांड आक्रमिलें, आणि तिसऱ्या पावलाला स्थलच न उरल्यामुळें बळीच्याच विनंतीवरून तें पाऊल बळीच्या मस्तकीं ठेवून त्यास पाताळीं चेपलें. विष्णूनें हा सर्व छळ बळीचें सत्यप्रतिज्ञत्व पारखण्याकरितां केला. तो कसोटीस उतरला असें पाहून विष्णूनें त्यास पाताळाचें स्वतंत्र राज्य दिलें व आपण त्याचा निरंतरचा द्वारपाळ होऊन राहिला. शिवाय या परीक्षेमुळेंच बळीचें नांव समग्र विश्वांत जिवन्त राहिलें आहे, व पृथ्वीलाही गंगेच्या पवित्र जलप्रवाहाचा लाभ घडला आहे. हाच दशावतारांपैकीं पांचवा वामनावतार होय. ' त्रिलोकी '=त्रिभुवनरूपा सुंदर स्त्री. ' मौक्तिकावलि '=मोत्यांचा सर. ' आवलि '= सर, माळ.

( ७८ )

**नको छळ, अधीर मी, तशि न कीर्ति हो; चामरें**
**नृपासि उचितें; वृथा, मिरविलीं जरी पामरें;**
**अकीर्तिच असो, रुचे तुज कशी व्रजीं कांबळी?**
**असें न समजा कसें, वरिल हारिला कां बळी?**

**अर्थ**—परंतु, हे देवा, मला असला छळ नको, कारण तो सहन करण्याइतका दमदारपणा माझ्या अंगीं मुळींच नाहीं. मला बळीसारखी ख्याति मिळाली नाहीं तरी चालेल. अहो, तीं ( अपूर्व अशीं ) चामरें ( बळीसारख्या ) राजालाच शोभतात; तीं माझ्यासारख्या दुर्बळानें मिरविणें केवळ निष्फळ व हास्यास्पद आहे. मला अकीर्तिच पत्करली; ( अहो मला ' बावळट ' म्हणून हंसूं नका, कारण, ) तुम्ही गोकुळांत होतां, त्या वेळीं काळी कांबळी तुम्ही कशी बरें आवडीनें पत्करलीत ? ( शिवाय, माझ्या दुबळेपणाबद्दल मला हिणवण्यांत काय अर्थ आहे ? मी कांहीं आपला दुबळेपणा झांकूं पहात नाहीं. ) अहो, तुमच्या ध्यानांत हें कसें येत नाहीं, कीं, ज्याच्या अंगांत सामर्थ्य आहे, तो आपण होऊन उगीच हार कां खाईल ? ( माझ्या अंगांत खरोखर बळ असतें तर मी स्पष्ट सांगितलें असतें कीं, ' करा माझा वाटेल तसा छळ ! ' पण तें बळ नाहीं म्हणून तर ही मनधरणी चालविली आहे. मग मला ' कमकुवत ' म्हणून हिणाविणें योग्य होईल काय ? )

**टिप्पणी**–' अधीर '=धीर (=धीट, धैर्यवान् ) नाहीं असा, कमकुवत. ' चामरें '=चवऱ्या. छत्र, चामर, अबदागीर, वगैरे राजचिन्हें मानलेलीं आहेत. ' व्रज '=गोकुळ. ' हार वरणें=अपजय कबूल करणें, पड घेणें.

( ७९ )

**छळाल कृपणासि कां ? अजि ! दयानिधे ! कापिती**
**भटासि भट संगरीं, परि न कातरा दापिती;**
**कराल तितकी कृपा बहु; अहो शरण्या, तमीं—**
**बुडोनि शरणागत श्रमतसें अरण्यांत मी.**

**अर्थ**—( पण हा माझ्या छळाचा वादविवादच नको. कारण, ) हे दयासागरा देवा, तुम्ही या दुबळ्याचा आधीं छळच कशाला कराल ? संग्रामांत वीर वीरांना छाटून काढतात, परंतु भ्याडांना उगीच भेडसावीत नाहींत, ( तर त्यांना गोंजारून धीरच देतात. ) तेव्हां तुम्ही माझ्यावर ( छळ न करितां ) जो कांहीं ( अल्प-स्वल्प ) प्रसाद कराल, तोच मला पुष्कळ झाला. अहो, शरण आलेल्यास अभय देणाऱ्या भगवाना, मी या ( संसाराच्या ) अरण्यात ( अज्ञानदुःखरूपी ) अंधारांत बुडून तुम्हांस शरण आलों असतांहि कष्ट सोशीत आहें, ( हें जसें मला वाईट, तसें तुमच्या शरणागतरक्षणाच्या ब्रीदासहि कमीपणाचेंच आहे. )

**टिप्पणी**—'कृपण'=पामर, दुबळा जीव. 'भट'=वीर, योद्धे. 'कातर'=भित्रा, भ्याड, भागूबाई. 'शरण्य'=शरण जाण्यास योग्य, शरणागतवत्सल.

( ८० )

**मुखासि जंव पातलीं ' श्रम, अरण्य ' ऐशीं पदें,**
**निजस्मृतिस जाहलीं विषय तीं तव श्रीपदें;**
**गुरूक्तिस करावया सफल, जानकीजीवना,**
**धरासुरतपःफळें त्वरित धांवलीं जीं वना.**

**अर्थ**—( मागील केकेंतील ) 'श्रम' व 'अरण्य' हे शब्द तोंडात येतांक्षणींच, हे नारायणा, तुझ्या ( रामरूपाच्या ) सुंदर चरणाची मला आठवण झाली आहे; कारण, हे सीतापते, वडिलांचें वचन पुरें करण्यासाठीं, तेच तुझे चरण ( दंडकारण्यांत तप करणाऱ्या ) ब्राह्मणांच्या तपांच्या फळाचेंच जणूं काय रूप धरून मोठ्या घाईनें अरण्याकडे धांवले.

**टिप्पणी**—'पदें'=शब्द. 'श्री'=मंगल, वैभवशाली, पवित्र. 'स्मृतिस विषय झालीं'=आठवणीची वस्तू झालीं, आठवलीं. 'गुरु+उक्ति'=बापाचें वचन. 'धरा+सुर+तपः+फळें'=भू+देव+तपः+फळें. ब्राह्मणांच्या तपाचीं फळें अशीं, ब्राह्मणांचें तप सफळ करणारीं, दंडकारण्यांतील राक्षसांचा त्रास नाहींसा करून तेथें तप करणाऱ्या ब्राह्मणांस सुखी करणारीं.

( ८१ )

**तर्यी प्रभुवरा ! तसे सदय, कां असे आज हो ?**
**विचारुनि पहा बरें निजमनीं, महाराज हो !**
**वनोवनिं फिरा पिशापरि, म्हणा अहोरात्र 'हा' !**
**नसे कुशल भाषणीं, परि असे कृपापात्र हा.**

**अर्थ**—त्या रामावतारीं, देवा, तुम्ही इतके दयाळू होतां, मग आजच असे निर्दय कसे बनलां? अहो महाराज, या गोष्टीचा आपले मनांत जरा विचार करून पहा. त्या वेळीं ( सीतेसाठीं प्रेमविव्हल होऊन, तिला शोधीत ) रात्रंदिवस, 'हाय, हाय !' म्हणून वेड्यासारखे तुम्ही रानोमाळ भटकलां ! ( मग आजच प्रेमहीन कसे बनलां ? ). देवा, माझ्याजवळ गोड बोलण्याचें कसब नाहीं, हें खरें, ( कारण, मी तुम्हांला 'पिसेवेडे' म्हणतों, ) पण ( त्याबद्दल रागावूं नका, ) मी खरोखरच कृपा करण्यास पात्र आहें.

(८२)

**समागम तुझा घडो म्हणुनि जाहले लाकडें,**
**तपोऽनलिं तसे मुनि त्यजुनि, जोडिलीं माकडें;**
**अयुक्त बहु ज्या जनास्तव घडे, पडे सांकडें,**
**तदुक्तिहुनि आमुचें बहुत बोलणें वांकडें.**

**अर्थ**—तुझी संगती लाभावी म्हणून ज्यांनीं तपोरूप अग्नींत आपलीं शरीरें लांकडांप्रमाणें जाळलीं, अशा महान् महान् तपस्वी मुनींना बाजूस टाकून, तुम्हीं वानरांशीं सख्य केलेंत; अशा तऱ्हेच्या भलत्याच गोष्टी जिच्याकरितां तुम्हांला कराव्या लागल्या, व दुसरींहि संकटें प्राप्त झालीं त्या सीतेच्या बोलण्यापेक्षांहि आमचें बोलणें जास्त वांकडें वाटतें काय ?

**टिप्पणी**—'तपोऽनल'=तपस्+अनल=तपोरूप अग्नि. ' अयुक्त'=अयोग्य, वेड्यावांकड्या, भलत्या. ' ज्या जनास्तव '=ज्या व्यक्तीसाठीं, ज्या माणसामुळें, ज्या सीतकरितां. ' जन ' हा शब्द सामान्यलिंगी आहे. जसें, स्त्रीजन, अबलाजन. ' सांकडें '=संकट, ' तत्+उक्ति '=त्या जनाचें भाषण, सीतेचें वचन.

(८३)

**जगत्त्रयमनोहरा, बलगुणैकरत्नाकरा,**
**म्हणे ' कनकरंकु द्या मज, महा प्रयत्ना करा; '**
**प्रियाहि अशि जाहली तुज कुकार्य आज्ञापिती;**
**सुधा त्यजुनि कामुक प्रगट अंगनाज्ञा पिती.**

**अर्थ**—हे त्रिलोकीचें मन हरण करणाऱ्या व बलादि गुणांच्या संपूर्ण सागरा देवा, तुला सीता म्हणाली, " प्रयत्नाची पराकाष्ठा करून मला सोन्याचा हरिण आणून द्या." ती तुमची प्रिया असूनही तिनें

तुम्हांला हें भलतेंसलतें काम करण्याची आज्ञा केली. ( पण तुम्ही तरी ती शिरसा वंद्य कशी केलीत ? अथवा ) स्त्रैण लोक सुधेचा अव्हेर करून बायकोचें वचन उघडउघड आवडीनें सेवन करितात, ( असा अनुभव येतो. )

**टिप्पणी**— वल+गुण+एक+रत्नाकर'=सामर्थ्यगुणाचा संपूर्ण सागर; **पूर्ण** सामर्थ्यवान्. त्रिजगन्मनोहर राम जवळ असतां सोन्याच्या मृगानें सीतेचें मन हरलें, हा एक चमत्कार, आणि पूर्ण सामर्थ्यवान देवाला हलकट हरिण पकडण्याची कामगिरी तिनें सांगावी हें दुसरें आश्चर्य 'कनक+रंकु'=सुवर्ण+मृग. 'कामुक'= स्त्रियांचे नादी, स्त्रैण. 'प्रगट'=प्रकट, उघड्या उघड. 'अंगना+आज्ञा'=बायकोचा हुकूम. 'पिती '=आवडीनें सेवितात, पाळतात.

( ८४ )

**स्वदास समयीं जपे तरि न दे वरा, चाकरी—**
**चुके न परि सार्थक श्रम न देवराचा करी;**
**वदेहि भलतेंचि, तें तिसचि, कोप टाका, पुसा;**
**असें मृदु म्हणोनि बा, मज न धोपटा कापुसा.**

**अर्थ**—अगदीं सेवकासारखी वक्तशीर कामागिरी करणारा लक्ष्मण, पण या सीतेनें त्याला कधींही कृपेचा मोबदला दिला नाहीं. तो सेवेमध्यें कधीं रतिमात्र चुकला नाहीं, पण हिनें त्या दिराच्या श्रमाचें कधींही ( गोड शब्दानें ) चीज केलें नाहीं. उलट त्याला अद्वातद्वा वांकडें बोलली. ( मी बोलतों याचा ) आपण राग न मानतां, हें खरें कीं खोटें, तें सीतेलाच विचारा. आपला गरीब मवाळ सांपडलों, म्हणून ( खरें बोलत असतांहि, त्याचा राग मानून ) उगीच कापसासारखा मला धोपटूं नका.

**टिप्पणी—**' समयीं ' = योग्य वेळीं. ' सार्थक ' = चीज, मोल. ' देवर'= दीर. राम सुवर्णमृग धरण्यास गेले असतां, लक्ष्मण सीतेच्या रक्षणार्थ राहिला होता.

इतक्यांत ' हे सीते ! हा लक्ष्मण ! ' अशी आरोळी त्यांच्या कानीं आली. ही आरोळी वास्तविक हरिणरूप धरलेल्या व रामबाणानें विद्ध झालेल्या मारिच राक्षसाची होती. त्यानें ही आरोळी कपटानें रामासारखा स्वर काढून मारिली असल्यामुळें ती रामाचीच अंतकाळची आरोळी आहे, अशी सीतेची समजूत झाली, व तिनें रामसाह्यास जाण्याला लक्ष्मणास सांगितलें. त्यावर ' रामावर प्राणसंकट येणें शक्य नाहीं. हें राक्षसाचेंच कांहीं तरी कपट आहे, ' अशी लक्ष्मणानें तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. परंतु सीतेची समजूत पडली नाहीं, इतकेंच नाहीं, तर तिला लक्ष्मणाच्याच शीलाची शंका येऊन, " रामचंद्र मरावे, व त्यांच्यामागें आपण सर्वाधिकारी व्हावें, अशी तुझी पापवासना आहे असें मला खास वाटतें, " अशा दुर्वचनांनीं तिनें लक्ष्मणाच्या हृदयास घरें पाडलीं. ही कथा येथें अनुसंधेय आहे.

( ८५ )

**न जें प्रिय, सदोष तें; प्रिय सदोषही चांगलें;**
**स्वतोक पितरां रुचे, जरिहि कर्दमीं रांगलें;**
**तुलाचि धरि पोटिशीं काशि तदा यशोदा बरें ?**
**जरी मळविशी रजोमलिनकाय तूं अंबरें.**

**अर्थ**—( पण आमचे दोष तुम्हाला दिसावे, व देवा, सीतेचे दोष मात्र दिसूं नयेत, हें अगदींच स्वाभाविक आहे; कारण, ) जें नावडत असेल, तें नेहमींच आपल्या दृष्टीला सदोष दिसतें; उलट, जें आवडतें असेल, तें जरी सदोष असलें, तरीहि चांगलेंच वाटतें. चिखलांत जरी रांगलें, तरी आपलें मूल आईबापांना आवडतेंच. ( फार लांब कशाला ? तुम्ही आपल्याच बालपणची आठवण करा. ) लहानपणीं ( कृष्णावतारांत ) धुळीनें अंग लडबडून घेऊन तुम्ही कपडे मळवीत असां, तरी पण माता यशोदा तुम्हांला ( प्रेमानें ) आपल्या पोटाशीं कवटाळीत असेच कीं नाहीं ?

**टिप्पणी**--' स्व+तोक '=स्वतःचें मूल. 'कर्दम'=चिखल. ' पोटिशीं'=पोटाशीं. ' रजः+मलिन+काय'=धूळीनें माखलेलें शरीर ज्याचें असा. बहुव्रीहि स०. 'अंबरें'= वस्त्रें, कपडे.

( ८६ )

**तुझे कथिति गोपिका विविध तीस बोभाट, ते—**
**सुखप्रद गुणस्तवापरिस जाहले वाटते;**
**क्षमा न करि एकदा, तरिहि फार खोडी करां**
**न देचि भय, ताडनोद्यमसमेत सोडी करां.**

**अर्थ**---तुझ्या कितीतरी नानाप्रकारच्या कागाळ्या गोपी यशोदेला सांगत असत. परंतु त्याच कागाळ्या तिला गुणांच्या स्तुतीपेक्षांहि ज्यास्त गोड वाटत. एकदां मात्र तिनें तुम्हांला क्षमा केली नाहीं; तरीही तुम्ही फार खोड्या केल्याच. ( शेवटीं ) तुम्हाला भय लावण्याचें तिच्या हातून घडलें नाहींच, उलट ( तुमचे गोरेंमोरें भयग्रस्त तोंड पाहून ) तुम्हांस मारण्याचा आपला प्रयत्न आणि तुमचे बांधलेले हात, हीं दोन्ही तिनें एकदमच सोडलीं !

**टिप्पणी** –' विविध'=नानाप्रकारचे. ' बोभाट '=गाऱ्हाणीं, कागाळ्या. 'परिस' अधिक. ' ताडन+उद्यम+समेत '=मारण्याच्या उद्योगासकट. तिनें मारण्याच्या उद्योगासकट हात सोडले म्ह० मारण्याचा उद्योग सोडला व हातहि सोडले. येथें ' समेत ' (=सह ) शब्दाचा उपयोग करून, ' सोडणें ' शब्दाचा दोन अर्थी चमत्कारिक अन्वय केला आहे, म्हणून 'सहोक्ति' व 'श्लेष' अलंकार साधले आहेत.

( ८७ )

**जरी म्हणसि ' बांधिलें ' तरि न कष्टवीलें; करा—**
**विचार; जशि कष्टवा, तशि न कष्टवी लेंकरा;**

**यथेष्ट पुरतें जरी प्रथम दाम कां सांधिती ?**
**न ती प्रबळ गोपिका; तुज तुझी दया बांधिती.**

**अर्थ**—तुम्ही कदाचित् म्हणाल, कीं, 'यशोदामाईनें ( मला जरी मारलें नाहीं, तरी ) बांधलें होतेंच कीं नाहीं' ! तरी पण तिनें तुम्हांला श्रमविलें नाहीं, हें लक्ष्यांत घ्या. निदान तुम्हीं तिला जितके श्रम दिलेत, तितके कांहीं तिनें आपल्या मुलाला खास दिले नाहींत. तुम्हांला बांधावयाला तिनें दावें घेतलें, त्या वेळीं पहिलेंच दावें पुरें पडलें असतें, तर तिनें त्याला दुसरें दावें कशाला सांधलें असतें ? देवा, ती यशोदा गोपी कांहीं तुम्हांला बांधण्याला समर्थ नव्हती, पण तुमच्या दयेनेंच तुम्हांला बांधिलें. ( त्या आईचे तुम्हांला बांधण्याचे वृथा श्रम पाहून तुम्हांला त्या बिचारीची दया आली, आणि तिचे कष्ट वांचविण्याकरितांच तुम्हीं तिला आपल्याला बांधूं दिलेंत. )

( ८८ )

**तुम्हींहि बळि बांधिला, म्हणुनि आमुची माय जी—**
**मनांत सहजा दया, निपट टाकिली काय जी**
**सकोप दिसती गुरु क्षणभरीच जें तापलें**
**जल ज्वलनसंगमें, त्यजिन शैत्य तें आपलें.**

**अर्थ**—देवा, तुम्हींसुद्धां असाच बळिराजा बांधलात, म्हणून काय, आम्हां भक्त जनांची मावली जी आपल्या मनांतली सहज दया, ती साफ निपटून एकदम झाडून टाकिलीत असें समजावयाचें ? अहो, वडील माणसें रागावतात, पण तें रागावणें क्षणभरच टिकतें. विस्तवाच्या संगतीनें जरी ( कांहीं काळ ) पाणी तापलें, तरी आपला स्वाभाविक थंडपणा तें कांहीं कायमचा सोडीत नाहीं.

**टिप्पणी**—' सहजा '= साहजिक असलेली, नैसर्गिक. ' निपट '=साफ. ' जी ' ( चरण २ )=अहो. 'स+कोप '=रागावलेले. ' ज्वलन+संगम'=अग्नीचा संग.

( ८९ )

**प्रसिद्ध तुमचे महासदय पाय; जीवांकडे—**
**चुकी, म्हणुनि होतिल क्षणहि काय, जी ! वांकडे ?**
**न निष्ठुर पिता; म्हणे मनिं, ' न हो प्रजा टोणपी; '**
**अपथ्यरुचि रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी ?**

**अर्थ**—महाराज, तुमच्या चरणांची ' अत्यन्त दयाळू ' म्हणून मोठी कीर्ति आहे. मग, ( अज्ञ व दुर्बळ ) जीवाच्या हातून दोष घडतात, म्हणून ते एक क्षणभर तरी निर्दय होतील काय ? ( बाप मुलाला शिक्षा लावितो, तरी पण ) बाप कांहीं निष्ठुर नसतो, ( पण ) तो मनांत ( पुत्रवात्सल्यानेंच ) म्हणतो, कीं, " माझ्या मुलांनीं मूर्ख ठोंबे होऊं नये, ' ( आणि म्हणून त्यांच्याच बऱ्याकरितां प्रेम मनांत वागवूनच त्यांस जरूर तेव्हां शिक्षा करितो. ) अहो, कुपथ्याची चट ज्या रोग्याला लागली आहे, असा कोणता रोगी कडू औषधें सुखानें पितो बरें ? ( त्याला उताणा पाडून जोरावारीनेंच औषधें पाजलीं पाहिजेत. त्याप्रमाणेंच हट्टी, उनाड, किंवा खट्याळ मुलांनाहि शिक्षा करूनच ताळ्यावर आणावें लागतें. )

**टिप्पणी**—' प्रजा '=संतति, मुलें. ' टोणपी '=अडाणी, मूर्ख. ' अ+पथ्य+रुचि '=कुपथ्याची आवड ज्यास असा. बहुव्रीहि स०. ' रुग्ण ' = रोगी.

( ९० )

**असंख्य खळ संगरीं निजकरीं तुवां मारिले;**
**न निष्ठुरपणें, कृपा करुनि ते भवीं तारिले;**

**जगज्जनक तूं, मुलें सकळ जीव, यां भातुकें—**
**दटावुनिहि देशि बा; अमृत नेदिजे घातुकें.**

**अर्थ**—देवा, तूं युद्धांत किती दुष्टांना मारिलेंस, याची गणति नाहीं. पण ते कांहीं निर्दयपणें मारिले नाहींस, तर प्रसादच करून त्यांस संसारपार नेलेंस. देवा, तूं जगाचा पिता आहेस, हे जीवमात्र तुझीं लेंकरें आहेत. यांना तूं रागावतोस, पण रागावूनहि त्यांस ( मोक्षरूपी ) खाऊच देतोस. जो घात करावयाला सज्ज झाला आहे, तो कांहीं कधीं अमृत देत नसतो ( तर विष देतो ); तेव्हां ज्या अर्थीं तूं दुष्टांनाहि अमृत ( =मोक्ष ) देतोस, त्या अर्थीं तुला घातक म्हणतांच येत नाहीं. )

**टिप्पणी**—'भव '=संसार. 'भातुकें '=खाऊ. 'नेदिजे' ( कर्मणि )=न दिजे दिलें न जावें.

( ९१ )

**वरी प्रकट शांतिला धरि, परंतु मीना बकी—**
**गिळी; तशि तुला टपे सुकृतबुद्धिहीना बकी;**
**जिणें गरळ पाजिलें अमृत पाजिलें तीस तें,**
**खळासि न दिसो भलेपण, खरें भल्या दीसतें.**

**अर्थ**—वरून दिखाऊ शांति मिरवूनही बगळी जशी ( संधि आल्याबरोबर ) माशाला गिळते, तशीच ती पापी व दुर्बुद्ध पूतना राक्षसी तुला गिळण्याला टपत होती. परंतु ज्या पूतनेनें ( स्तनाला लाविलेलें ) विष तुला पाजलें, त्याच पूतनेला तूं मात्र अमृत ( =सुधारस, पक्षीं मोक्ष ) पाजलेंस. दुष्टांना जरी हें तुझें भलेपण दिसलें नाहीं, तरी भल्या लोकांना तें स्पष्ट दिसतें.

**टिप्पणी—**' मीन ' मासा. ' सुकृत + बुद्धि + हीन ' = पुण्य + सन्मति + रहित=पापी व दुष्टमति. ' बकी ' ( चरण १ ) = बगळी. ' बकी ' ( चरण २ ) =पूतना. केका २ पहा. ' गरळ ' = विष.

( ९२ )

**सदाहि हित नायकों, बहु अपाय केले करूं;**
**तरी सकृप बाप तूं म्हणसि, ' नायके लेंकरूं; '**
**कधीं न करिसी, प्रभो, भजकबाळकोपेक्षण,**
**न तूजवरि ज्यापरी पशुपपाळ कोपे क्षण.**

**अर्थ—**नेहमीं चांगली गोष्ट सांगितली असतांहि ती आम्ही ऐकत नाहीं आणि पुष्कळ अनर्थकारक कृत्यें करीत असतों व पुढेंहि करणार, ( असे आम्ही अल्लड ) व मूढ आहों, परंतु तूं आमचा दयाळू व प्रेमळ पिता इतकेच ( उद्वेगाचे ) उद्गार काढितोस, कीं, " काय करावें हो, हें पोर ऐकतच नाहीं ! " पण ( असे उद्गार काढलेस तरी, ) हे प्रभो, गवळ्यांचा राजा नंद जसा तुझ्यावर कधीं क्षणभरहि राग करीत नसे, त्याप्रमाणेंच भक्तबाळांची आबळ तुझ्याकडून कधींहि घडत नाहीं.

**टिप्पणी—**' भजक+बाळक+उपेक्षण'=भक्त+लेंकरें+हयगय, आबळ. ' पशु+प+पाल'=गो+पालक+पति, गवळ्यांचा राजा, नंद.

( ९३ )

**खरा जनक तूं, जनां इतर कोण हो देव वी ?**
**समीहित फळें जगा तव पदाब्ज दे, देववी;**
**अशीच करुणा असो हरि, कधीं न भंगो पिता;**
**अशा मज असाधुला इतर कोण संगोपिता ?**

**अर्थ**—हे प्रभो, तूंच आमचा खरा जनक आहेस, कारण, या सर्व जीवांना निर्माण करणारा तुझ्यावांचून दुसरा कोणता देव आहे? तुझें कमलासारखें पाऊलच या जगाला कल्याणकारक इष्ट वस्तू स्वतः देतें व ( इतर देवदेवता, साधुसंत, तीर्थक्षेत्रें इत्यादिकांकडून ) देववितें. हे हरे, तुझी कृपा अशीच अखंड असो; आमचा जनक जो तूं, त्याचा कधींहि राग न होवो. माझ्यासारख्या पापमलिनाचें लालनपालन दुसरा कोण बरें करील ? ( इतर सर्व मला कंटाळतील, किंबहुना कंटाळलेच आहेत; आतां सर्व आधार तुझाच आहे. )

**टिप्पणी**—'वी'=वितो, निर्माण करतो. 'समीहित'=कल्याणप्रद व इष्ट. 'भंगणें'=रागावणें, प्रतिकूल होणें. अन्त्य चरणासंबंधें मागें केका ९–११ पहा.

( ९४ )

**सुविद्य, धन मेळवी, वचन आयके, आवरी**
**प्रपंच, भर घे शिरीं, करि कृपा पिता त्यावरी;**
**असा जरि नसे, रुचे तरि न तो अभद्र क्षण;**
**तसा तुजाचि आवडे; करिसि तूंचि तद्रक्षण.**

**अर्थ**—( लोकरीति अशी आहे, कीं, ) जो मुलगा विद्यासंपन्न आहे, पैका कमावतो, संसार संभाळतो, व आपल्या शिरावर कुटुंबाचा भार घेतो तो बापाला फार प्रिय होतो. परंतु जर तो असा गुणवान् नसेल तर तो करंटा बापाला क्षणभरहि सोसत नाहीं. परंतु बा देवा, असा करंटाहि तुलाच आवडतो व तूंच त्याचा प्रतिपाल करतोस.

**टिप्पणी**—'सु + विद्य' = चांगली आहे विद्या ज्याची, विद्यासंपन्न. बहुव्रीहि स॰ 'अभद्र' = अमंगळ, अशुभ, करंटा, दळभद्रा.

(९५)

**पिता जरि विटे, विटो; न जननी कुपुत्रीं विटे;**
**दयामृतरसार्द्रधी न कुळकज्जलें त्या किटे;**
**प्रसादपट झांकिती, परि परां गुरूंचे थिटे;**
**म्हणूनि म्हणती भले ' न ऋण जन्मदेचें फिटे '**

**अर्थ**—पण, देवा. बाप जरी करंट्या पोराला विटला, तर विटो; परंतु आई मात्र कधींहि विटत नाहीं. कुळाच्या कीर्तीला काळया काजळीप्रमाणें लागलेल्या त्या करंट्या पोरामुळें, दयामृताचा ओलावा जिच्या अंतरंगांत निरन्तर आहे अशी ती माउली कधींहि ( रागानें किंवा तिरस्कारानें ) गढूळ होत नाहीं. ( जन्मदाता, विद्यादाता, ज्ञानदाता, मोक्षदाता, इत्यादि ) इतर गुरूंचें कृपावस्त्र ( त्यांच्या बाळाला किंवा शिष्याला ) झांकतें खरें, पण तें एकंदरींत अपुरेंच पडतें. ( आईचें कृपावस्त्र मात्र बाळाला भरपूर पुरेसें होतें. ) याच कारणास्तव सज्जन म्हणतात, कीं " जन्मदात्या मावलीचें रीण कधींही फिटत नसतें. "

**टिप्पणी**—' दया + अमृत + रस × आर्द्र + धी ' = दया + अमृत+रस + ओलें + मन = दयामृताच्या रसानें चिंब झालें आहे मन जिचें ती. बहुव्रीहि स० ' कुळ + कज्जळ ' = कुळाची काजळी, कुळाच्या नांवाचा कलंक ( असा करंटा मुलगा ). ' किटणें ' = गंजणें, गढूळ होणें. थिटें ' = तोकडें, आंखूड. ' प्रसाद + पट ' = दयेचें वस्त्र, कृपेचें पांघरूण. ' जन्म + दा ' = जन्म देणारी.

(९६)

**विटेल जननीहि कीं शत रची निमित्तें विधि;**
**मळे कलियुगीं श्रुति जाशि खळीं, तिची तेंवि धी**
**कदाचित विटेल; बा, तव दया न दीनावरी;**
**जशी जगदघक्षयीं कर भवन्नदी नावरी.**

**अर्थ**—पण दुर्दैवानें ( मुलाच्या दुष्कृत्यांनीं ) शेंकडों कारणें घडल्यामुळें आईसुद्धां ( एकाद वेळेस ) कंटाळेल. या पापयुगात ( अपात्र, अधर्मी व नास्तिक ) दुष्टांच्या हातीं पडल्यामुळें जशी पवित्र वेदविद्याही निस्तेज झाली आहे, तशीच कुपुत्रामुळें आईची प्रेमळ प्रीतीहि कदाचित् मळीण होईल. परंतु हे देवा, जशी तुझ्या चरणापासून उद्भवलेली गंगानदी जगाच्या पापाचा नाश करण्याच्या कामगिरींत आपला हात मागें घेत नाहीं, तशचि तुझी दया मात्र अपराधी दुबळ्याचा कधींहि कंटाळा करीत नाही.

**टिप्पणीः**—' निमित्त '=कारण. ' विधि '=दैव, प्राक्तन, नशीब. ' श्रुति '= वेदविद्या. ' जगत्+अघ+क्षय '=जगाच्या पापाचा नाश. ' नावरी '=आवरीत नाहीं.

( ९७ )

**कृपाचि जननी तुझी, सकळ जीव दायाद; या—**
**तिणेंचि उपदेशिल्या करिति सर्व दाया दया;**
**असें उमजतां भले न गुरुभाव तो टाकिती;**
**मता तुजसि गोपिका, मग जनास तोटा किती ?**

**अर्थ**—तुझी कृपा हीच खरी आई, आणि हे सर्व जीव तिचीं लेंकरें होत. आणि ( ज्यांना आम्ही ' आई ' म्हणतों त्या ) या तुझ्याच कृपामाउलीच्या शिकवणीनें तयार झालेल्या दाया आमच्यावर दया करितात. असें जरी रहस्यज्ञान झालें, तरी ज्ञानी सज्जन आईबापा- विषयींची पूज्यबुद्धि टाकतात असें नाहीं. देवा, तुम्हीही आपली उपमाता यशोदा गवळण, हिला बहुमान देत असां, मग ( तुमच्या कृपेशीं तुलना केली असतां जरी आमच्या जन्मदात्या केवळ उपमाता

—दाया—ठरतात, तरी ) सामान्य लोकांनीं आपल्या जन्मदात्रीला 'आई' म्हणण्यास कोणती हरकत आहे ?

**टिप्पणी**—' दायाद '=भाऊभाऊ, एका कुटुंबांत जन्मलेलीं मुलें. चरण दुसरा—आईची माया हा ईश्वरी कृपेचाच अंशावतार आहे; मातेला वात्सल्याची प्रेरणा ईश्वरी दयेपासूनच होते. गुरु+भाव ' = वडिलांविषयीं—आईबापाबद्दलची—आदरबुद्धि. ' तोटा '=कमीपणा, दोष, हरकत.

( ९८ )

**भरोनि कुचकुंभ जी विषरसें मुखीं दे बकी,**
**प्रभो तिसहि ठेविशी जाशि महासुखीं देवकी;**
**न होति जननी कशा पशुपदार, गाई ? लया**
**न पावतिच तत्सुखें, कृति न कोण गाईल या ?**

**अर्थ**—हे प्रभो, आपल्या स्तनरूपी घटांत विष भरून जी तुला पाजूं लागली त्या पूतना राक्षसीलाहि तूं आपली आई जी देवकी तिच्याचप्रमाणें ( मोक्षदान देऊन ) परम सुखांत बसविता झालास; तर मग ( पूतनेप्रमाणें ज्या घातकी नव्हत्या, ज्यांचें तुमच्यावर प्रेम होतें, व ज्यांच्या स्तनावर तुम्हीं पोसलां, त्या ) गाई व नंदाची पत्नी यशोदा या जननीपदाला कशा पावणार नाहींत ? त्यांच्यापासून तुम्हांला जीं सुखें लाभलीं, त्यांना कधींच अन्त नाहीं. अशीं आपलीं गोड चरित्रें कोण बरें गाणार नाहीं ?

**टिप्पणी**—' कुच + कुंभ ' = स्तनरूपी भांडें. ' बकी ' = पूतना. मागें केका २, व ९१ पहा. ' देवकी '=वसुदेवाची पत्नी व कृष्णाची प्रत्यक्ष जन्मदाती आई. ' पशु + प + दार ' = गवळ्याची बायको, नंदपत्नी यशोदा. हिनें कृष्णाला वृंदावनांत आपला मुलगा म्हणून जन्मल्यापासूनच वाढविलें. ' लय ' = अन्त, नाश.

(९९)

**अशी तरि कृतज्ञता, हरि, तुझ्याच ठायीं, अगा!**
**सख्या, अणुचि मानिशी, करुनि सुप्रसादा अगा;**
**भुले सुकविवाग्वधू तव गुणा अनर्घ्या नगा;**
**म्हणेल जन कोण, कीं, 'यश पुनः पुन्हा तें न गा'?**

**अर्थ**—हे हरे, अशी (अपरंपार व कधींहि न विटणारी) दया केवळ एका तुझ्याच ठिकाणीं आहे. हे प्राणसख्या देवा, पर्वताएवढा प्रचंड व हितकारक प्रसाद करूनही, तूं त्याला रेणुप्राय अल्पस्वल्पच समजतोस. तुझ्या या गुणाच्या अमोल भूषणाला उत्तम कवींची उपवर कवितासुता नुसती मोहून जाते; मग तुझें एकदा पूर्वींच गाइलेलें यश पुन्हां पुन्हां गाऊन चर्वितचर्वण करूं नका, असें कोणाला तरी म्हणवेल का?

**टिप्पणी**—'सुप्रसादा अगा'=उत्तम प्रसादरूपी डोंगराला, डोंगराएवढा मोठा प्रसाद, प्रसादाचा डोंगर. 'अणु'=रेणु, रज, रति. 'अनर्घ्य'=ज्याचें अर्घ्य (करितां येत) नाहीं असा, अमोल. 'गुणा नगा'=गुणरूपी भूषणाला, अलंकाराला.

(१००)

**तुम्ही बहु भले, मला उमज होय ऐसें कथा;**
**कसा रसिक तो? 'पुन्हा,' जरि म्हणेल, 'आली कथा;'**
**प्रतिक्षण नवीच दे रुचि, शुकाहि संन्यासिया;**
**न मोहिति भवत्कथा अरसिका अधन्यासि या!**

**अर्थ**—देवा, आपण परम चांगले ज्ञानी अहां; तेव्हां माझी बरोबर समजूत पडेल, असें पुढील प्रश्नाचें विवेचन करा. (तुमच्या गोड चरित्राची पुनरावृत्ति केली असतां) 'अरे, पूर्वींचीच कथा

पुनः आली ' असे जो ( कंटाळ्याचे किंवा तिरस्काराचे ) उद्गार काढील, त्याला रसिक कसा म्हणतां येईल ? अहो, शुकासारख्या ( निःस्पृह व विरक्त ) संन्याशांनासुद्धां जिच्यांत क्षणींक्षणीं नवीनवीच गोडी आढळून आली, अशा तुमच्या सच्चरित्रांची कथा या एकट्या ( पुनरुक्तीला विटणाऱ्या ) अरसिक भावनाशून्य अभाग्यालाच काय ती मोह घालूं शकत नाहीं !

**टिप्पणी**- ' मोहिति '=मोहिते. ( तृ० पुरुषी स्त्री० ए० व० ) ' भवत्+कथा '=तुमचें चरित्र.

( १०१ )

**कथा श्रवणचत्वरीं जरि पुनःपुन्हा ये, रते**
**महारसिक तद्रसीं, विटाति ऐकतां येर ते;**
**विलोकुनि विलासिनीजन पुनःपुन्हा कामुका**
**करी वश; नव्हे बुळा विवश, घेइना का मुका !**

**अर्थ**—कानाच्या चबुऱ्यावर तीच ती कथा पुन्हां पुन्हां आरूढ झाली, तरी, जे खरे रसज्ञ आहेत, ते तिच्या रसांत रंगून जातात. इतर, म्हणजे अरसिक, मात्र तिला ऐकून कंटाळतात. विलासी स्त्री पुन्हां पुन्हां नेत्रकटाक्ष टाकून रंगेल लोकांचें चित्त हरण करिते, परंतु, जो बावळा पौरुषहीन आहे त्याचा ती प्रत्यक्ष मुका का घेईना, पण त्याच्यावर कांहींएक मात्रा लागू पडत नाहीं !

**टिप्पणी**—'श्रवण+चत्वर'=कर्णरूपी चौथरा, कानाचा चबुत्रा. 'तत्+रस'=तिची ( कथेची ) गोडी, ' येर' =इतर, अरसिक ' विलासिनी+जन'=विलासवती स्त्री, नखरेबाज बाई. ' कामुक'=कामरसिक, रंगेल. ' वश करणें '=कबजांत आणणें, अन्तःकरणाला मोहून टाकणें. ' विवश'=अधीन, आतुर.

( १०२ )

**कथा सुपुरुषा तुझी वश तशी करी, राधिका**
**जशी तुज, जिला स्वयें म्हणसि तूं ' शरीराधिका ';**
**तिचें न घडतां, रमाहृदयवल्लभा, सेवन**
**प्रभो, तुज जसें, तसें मतिस गेह भासे वन.**

**अर्थ**—हे देवा, ज्या राधेला तूं स्वतः आपल्या शरीराहूनही अधिक ( प्रिय ) समजतोस, तिनें तुला जसा मोह घातला होता; तसाच मोह तुझ्या चरित्राची कथा रसिक पुरुषाला घालते. हे प्रभो, तूं लक्ष्मीपति असूनही, राधेची संगति तुला घडली नाहीं, तर जसें तुला घर वनासारखें भासे, तसेंच ( रसिकाला कथाश्रवण घडलें नाहीं तर त्याच्या ) मनाला घर वनासारखें भासतें.

**टिप्पणी**—' शरीर+अधिका '=शरीराहून अधिक ( प्रिय ). 'रमा+हृदय+वल्लभ' लक्ष्मीच्या अन्तःकरणाचा अत्यन्त आवडता, लक्ष्मीपति.

( १०३ )

**कथा भुवनमोहिनी, अशि न मोहिनी होय; ती**
**हरो असुरधी; हिणें भुलविले किती हो यती ?**
**नव्हे न म्हणवे; असो; जरि विमोहिला दक्षहा,**
**प्रिया बसविली शिरीं, मुनिपथीं कसा दक्ष हा ?**

**अर्थ**—तुझी कथा जगाला मोह घालणारी आहे. इतका मोहक गुण ( तुमच्या ) मोहिनीरूपांतही नव्हता. ( तुमची ) मोहिनीनें राक्षसांच्या मनाला मोह घालो, पण या कथेनें कित्येक इंद्रियनिग्रही यतीनांही भुलविलें आहे ! आतां मोहिनीनें कोणीही यति मुळींच

भुलविला नव्हता, असें म्हणवत नाहीं, हें खरें; पण, जरी मोहिनीनें दक्षाचा संहार करणाऱ्या शंकराला मोह घातला, तरी, ज्या शंकरानें आपली प्राणप्रिया ( गंगा ) डोक्यावर बसवून ठेविली, तो हा ( बाईल-वेडा ) शंकर मुनिव्रतामध्यें किती दक्ष गणावा बरें ? ( प्रत्यक्ष सासऱ्याला रागाच्या सपाट्यांत मारून, परक्या स्त्रीला खुशाल डोक्या-वर चढविणाऱ्या शंकराला भुलविण्यांत मोहिनीची करामत ती कसली ? पण तुमच्या कथेकडे पहा. तिनें अस्सल अस्सल संयमनशील यतिश्रेष्ठांना आपल्या नादीं लाविलें आहे ! )

**टिप्पणी**—'मोहिनी'–समुद्रमंथनानंतर दैत्य अमृतप्राशनाकरितां झगडूं लागले. तेव्हां त्यांना चकवून 'सुधे'च्या, ऐवजीं 'सुरा' पाजण्याकरितां विष्णूंनीं 'मोहिनी'–अवतार धारण केला. हें रूप इतकें मोहक होतें, कीं, क्षणमात्र त्याच्या दर्शनानें यतिश्रेष्ठ शंकरसुद्धां भुलल्यासारखे झाले ! मग त्या मोहिनीनें दैत्यांना नादावून सुरेच्या फाशांत अडकविलें, तर नवल कसलें ? 'असुर+धी'=दैत्यांची बुद्धि. चरण ३–अन्वय ( मोहिनीनें यति भुलविला ) नव्हे, ( असें ) न म्हणवे, ( तें ) असो (=मला कबूल आहे ); इत्यादि. 'दक्ष+हा'=दक्षाला मारणारा, शंकर. एकदा दक्षानें यज्ञ केला, परंतु त्या प्रसंगीं, आपली मुलगी पार्वती व जांवई शंकर, यांना आमंत्रण केलें नाहीं. तथापि शंकराच्या मर्जीविरुद्ध पार्वती आमंत्रणावांचूनच आली. तेथें तिचा अपमान झाल्यावरून, तिनें यज्ञाग्नींत स्वतःचा देह अर्पण केला. त्यानंतर शंकर तेथें आले व त्यांच्या जटेपासून उत्पन्न झालेल्या वीरभद्रानें दक्षयज्ञाचा विध्वंस करून, दक्षाचाही वध केला. 'दक्ष'=तत्पर, जपणारा.

( १०४ )

**सुरासुरनरोरगां भुलवुनी कथा न त्यजी;**
**न भेद करि पंक्तिचा; अमृत पाजिती सत्य जी;**
**तिणें जरि सुधारस स्वरतमानसां पाजिला,**
**वधी अमृत घोंटितां, द्रव न येचि बापा ! जिला.**

**अर्थ**—मोहिनीप्रमाणेंच कथाही देव, दानव, मानव, नाग, वगैरे सर्वांना भुलविते, परंतु भुलविल्यावर मोहिनीप्रमाणें त्यांना झिडकारीत नाहीं, किंवा ( देवांना सुधा आणि दैत्यांना सुरा, अशा प्रकारचा ) पंक्तिभेद करीत नाहीं; तर सर्वांना खरोखरीचें अमृत (=मोक्ष, परमगतीचा आनंद ) पाजिते. मोहिनीनें आपल्याला भुललेल्या दैत्यांना अमृत पाजण्याचा आविर्भाव केला, पण बाबा, ते अमृत गिळीत असतांनाच त्या निर्दय पाषाणवृत्तीच्या मोहिनीनें त्यांचा वध केला.

**टिप्पणी**–'सुर+असुर+नर+उरग'=देव+दैत्य+मानव+नाग. 'स्व+रत+मानस'= आपल्या ठिकाणीं रममाण झालीं आहेत मनें ज्यांचीं असे. बहुव्रीहि स० 'घोंटणें'= पिणें, गिळणें. मोहिनीनें दैत्यांना ठकवून त्यांच्या तोंडीं सुरा ओतली, पण देवांच्या पंक्तीला तिनें सुधेचें वाढप सुरू केलें. ही गोष्ट राहू व केतू या दोन दैत्यांच्या ध्यानीं आली, आणि ते देवांचा वेष घेऊन त्यांच्या पंक्तींत घुसले व मोहिनीनें त्यांना अमृत वाढलें. परंतु इतक्यांत त्यांचें दानवत्व उघडकीस आलें, व तें अमृत त्यांच्या घशाखालीं उतरण्याच्या पूर्वींच त्यांचा शिरच्छेद झाला.

( १०५ )

**अभीष्ट वरितात, जे तव कथेस विश्वासती;**
**भली असुरवंचनीं श्रुत असेचि विश्वास ती;**
**कथा कशि सखी तिची ? ठकवुनी हरी संचितें,**
**तरी अमृत दे; असें सदय, दाखवी वंचितें.**

**अर्थ**—जे तुझ्या कथेवर श्रद्धा ठेवितात, त्यांना इष्ट लाभ घडतो; परंतु ती मोहिनी दानवांना फसविणारी म्हणून जगाला चांगली माहीत आहे. मग, तुझी कथा मोहिनीच्याच वर्गांतली, असें कसें म्हणतां येईल? तुझी कथाही भुलवून ठकविते, पण ती ठकवून काय करते, तर भुलणाराचें संचित कर्म गडप करून, त्याला अमृत ( मोक्ष ) देते. ती कथा आपल्या फसवणुकीनें आपण दयाळू आहों, असें प्रत्ययाला आणून देते.

**टिप्पणीः**—' सखी '= सोबतीण, एकाच वर्गातली, तुल्य गुणाची अन्वय—कथा तिची ( मोहिनीची ) सखी कशी ? ( ही कथा ) ठकवुनी संचितें हरी, तरी अमृत दे; ( ही ) वंचितें सदय असें दाखवी. ' वंचितें '=वंचना करून, फसवणुकीनें. ' संचित '= पूर्वजन्मांतील कर्म. कर्मांचे तीन प्रकार आहेत; एक, प्राक्तन म्हणजे पूर्वजन्मीं आचरलेलें कर्म; दुसरें, संचित म्हणजे पूर्वजन्मीं केलेल्या ज्या कर्मांचें फळ विद्यमान जन्मीं भोगावयाचें आहे तें. तिसरें, क्रियमाण म्हणजे हल्लींच्या जन्मांत जें कर्म केलें जातें व ज्याचे परिणाम शिल्लक असलेल्या हल्लींच्या आयुष्यांत व पुढील जन्मांत भोगावयाचे असतात, तें कर्म. भगवत्कथाश्रवणानें संचिताचा ठेवा नाहींसा होतो, आणि क्रियमाणही बंधक होत नाहीं; येणेंकरून जीवाला मोक्षलाभ होतो.

( १०६ )

**करा श्रवण येवढें, अपटु लोक हांसो मला;**
**अहो, जरि गिळावया प्रियकुमार घे सोमला,**
**तयासि ठकवूनि, दे बहुत शर्करा माय जी,**
**तिला स्वशिशुवंचनें अदयता शिवे काय, जी ?**

**अर्थ**—देवा, आतां तुम्हीं तरी एवढें माझें बोलणें ऐकून घ्याच; मग ज्यांना या गोष्टींतील मर्मच कळत नाहीं, ते मला हंसले, तरी त्याचें मला कांहींएक वाटणार नाहीं. अहो, आपल्या आवडत्या अजाण मुलानें सोमल गिळण्याकरितां घेतला आहे, अशा वेळीं जी आई त्याला फसवून ( त्याच्या हातावरचा सोमल त्याच्या न कळत घेते व ) त्याच्या हातावर बरीचशी साखर देते, ती आई आपल्या मुलाला ठकविल्यानें निर्दयपणाच्या दोषाला पात्र होते काय ?

**टिप्पणी**—'अ+पटु='अज्ञ, मर्म न जाणणारे, अरसिक.

( १०७ )

**म्हणोनि बहु मोहिनीहुनि भली कथा हे तुजी,**
**अभीष्ट फल द्यावया नतमनोरथा हेतु जी;**

**म्हणाल जरि, मीच त्या, विषम काय दोघींत रे ?**
**जसा जन सिताऽसिताभिधनदीसदोघीं तरे.**

**अर्थ**—म्हणून, दासांच्या मनोरथांना इच्छित फळ देण्याला जी कारण होते, ती तुझी कथा मोहिनीपेक्षां फारच चांगली आहे. तुम्ही कदाचित् असें म्हणाल, कीं, " अरे, कथा आणि मोहिनी या दोन्ही मीच, मग त्यांच्यांत भेद कोठून येणार ? शुभ्र वर्णाची गंगा व कृष्ण वर्णाची यमुना, या दोन्ही नद्यांच्या पवित्र प्रवाहांत लोक जसे सारखेच उद्धरतात, ( तसे ते कथा व मोहिनी यांच्या सेवनानेंही सारखेच मोक्ष मिळवितात )."

**टिप्पणी**— ' अभीष्ट '=इच्छित, आवडतें. ' नत+मनोरथ '=नम्र दासांची मनीषा. 'हेतु'=कारण. 'विषम'=वेगळेपणा, भेद. 'सिता+असिता+अभिध+नदी+सत् +ओघीं '=पांढरी व काळी अशीं नांवें ज्या नद्यांना ( आहेत ) त्यांच्या पवित्र ओघांत.

( १०८–१०९ )

**अहा ! बहु विशुद्ध हे, प्रभु ! तव स्वरूपाहुनी;**
**न भिन्नतनु त्या; भले भजति, एकता पाहुनी;**
**परंतु वदतों जनानुभव, नातळो पाप, गा !**
**तशी न यमुना गमे, जशि गमे निलिंपापगा,**
**जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं जिचें नांदणें,**
**जिच्या जळमळें तुळे न शरदिंदुचें चांदणें,**
**प्रजा हरिहरांअशा यदुदरीं अनेका, कवी**
**भिऊनि म्हणतील कां ? ' जशि सुधा, तशी काकवी.'**

**अर्थ**—हे प्रभो, ही तुझी कथा तुझ्या मोहिनीस्वरूपाहून खास जास्त शुद्ध आहे. ( त्या गंगायमुनाचा दाखला येथें लागू पडत नाहीं, कारण, ) त्या गंगा यमुना मुळींच भिन्नरूप नाहींत, आणि

सर्व सुज्ञ त्यांचें एकरूपत्व जाणूनच त्यांना भजतात. तरीपण मी सामान्य लोकांचा अनुभव सांगतों, मात्र हा अनुभव सांगण्यांत मला पापाचा स्पर्श न होवो म्हणजे झालें !

विश्वाचे गुरु जे शंकर त्यांच्याच प्रत्यक्ष मस्तकावर जी नांदते, जिच्या जळांतील चिखलाचीही सर शारदीय चंद्राच्या स्वच्छ चांदण्याला येत नाहीं, जिच्या उदकांत मरण आल्यानें अनेक मानव विष्णुस्वरूप अगर शिवस्वरूप होऊन राहिले आहेत, अशी देवनदी भागीरथी जशी ( सामान्य लोकांना ) वाटते, तशी यमुना वाटत नाहीं. अहो, जे शहाणे आहेत, ते ( कोणी हंसेल किंवा रागावेल म्हणून ) भिऊन कधींही ' जशी सुधा, तशीच काकवी, ' असें म्हणणार नाहींत.

**टिप्पणी—**' वि + शुद्ध ' = अत्यंत शुद्ध. ' हे ' = ही. ' भिन्न + तनु ' = भिन्न शरीरें ज्यांचीं अशा, भिन्नस्वरूप. ' एक + ता ' = एकपणा, एकभाव, ऐक्य. ' न + आतळो '= न शिवो. ' निलिंप + आपगा ' = देवनदी, गंगा. ' जगत् + गुरु + महेश्वर + प्रभु + शिरीं ' = जगाचा पिता जो महादेव त्याच्या मस्तकावर. ' शरद् + इंदु ' = शरदृतूंतील चंद्र.–आश्विन कार्तिक हे शरन्मास. या महिन्यांत चंद्राचें तेज विशेष स्वच्छ असतें. हरिहरांअशा ' = विष्णु व शंकर यांच्या सारख्या, विष्णुस्वरूप व शिवस्वरूप झालेल्या.'प्रजा'=मानव, लोक. गंगाप्रवाहांत मरण आलें असतां विष्णुभक्त विष्णुस्वरूप होतात, व शिवभक्त शिवस्वरूप होतात. ' काकवी'=गुळाच्या मळाची राब.

( ११० )

**तुलेस यमुनेसवें, कुवलयद्युतिश्यामला !**
**म्हणाल जरि मोहिनी निजतनू, अवश्य मला;**
**तुलीन अमृतोदधिप्रभवपुंडरीकामला**
**कथा सुरधुनीसवें, सुजन जींत विश्रामला.**

**अर्थ**—हे नीळकमळासारख्या सांवळ्या नारायणा, यमुनेबरोबर तुलनेकरितां ( गंगेचें नांव न काढतां ) जर आपली मोहिनी नांवाची मूर्ति म्हणाल, तर मला ती अगदीं योग्यच वाटेल; आणि मग मीही सुधासमुद्रांत उगवणाऱ्या श्वेत कमलाप्रमाणें जी निर्मळ आहे, व जींत सज्जनांना विसावा लाभतो, अशा कथेची तुलना देवनदी गंगेबरोबर करीन.

**टिप्पणी**—पूर्वार्ध अन्वय-हे कुवलयद्युतिश्यामला ( नारायणा ), यमुनेसवें तुलेस जरी निजतनू मोहिनी म्हणाल, ( तरी ती ) मला अवश्या ( असे ). 'कुवलय+द्युति+श्यामल'=निळ्या कमळाच्या कान्तीप्रमाणें सांवळा. 'अवश्या'=अगदीं योग्य, फारच उत्तम. 'अमृत+उदधि+प्रभव+पुंडरीक+अमल'=सुधा+समुद्र+उद्भव+श्वेत कमल+निर्मळ'=सुधा समुद्रांत उद्भव ज्याचा अशा पांढऱ्या कमळाप्रमाणें निर्मळ. 'सुर+धुनी'=देवनदी, गंगा. 'विश्रामणें'=विसावा लाभणें.

( १११ )

**शुकोदित पुराण ज्या श्रवण सन्मुखें साग्रही,**
**म्हणेल 'अतुला कथा;' झणिं म्हणाल, 'तो आग्रही'**
**न केवळ मलाचि हे निरुपमा, यशोमंडिता,**
**गुरूसहि गमे, पुसा स्ववरदा महापंडिता.**

**अर्थ**—ज्याला शुकानें सांगितलेल्या भागवत पुराणाचें समग्र श्रवण उत्तम वक्त्याच्या तोंडून घडलें आहे, तो, हे भगवन्ता, तुझी कथा अप्रतिम आहे, असेंच म्हणेल. पण तुम्ही त्याला 'तो दुराग्रही—हठवादी—आहे,' असें मात्र म्हणूं नका हो! कारण, ही भागवतकथा मलाच एकट्याला अप्रतिम व भगवद्यशानें शोभलेला वाटते असें नाहीं, तर माझ्याहून ज्यांचें ज्ञान पुष्कळ अधिक आहे अशा थोरामोठ्यांसही तशीच वाटते. फार लांब कशाला, तुम्हांलाच वर देणाऱ्या आपल्या महाज्ञानी सांदीपनि गुरूला विचारा बरें.

**टिप्पणी**—'शुक+उदित'=शुकानें सांगितलेलें. मागें केका ७२ पहा. 'स+अग्रही'-

=संपूर्णच, आरंभापासून थेट समाप्तीपर्यंत. 'अ+तुला'=नाहीं तुला ( उपमा ) जिला ती, अप्रतिम. ' झणिं म्हणाल '=कदाचित् तुम्हांला म्हणावेंसें वाटेल, म्हणूं नका हो ! ' आग्रही '=आपल्याच मताला हट्टानें चिकटून बसणारा, हठवादी. ' निर्+उपमा ' = निस्तुला, अप्रतिम. ' स्व+वर+द '=स्वतः-तुम्हांला वर देणारा. सांदीपनि हा कृष्णाचा गुरु होता. याच गुरूच्या घरीं कृष्णाच्या सहाध्यायांत सुदामा होता, व कृष्णाचा आणि त्याचा प्रेमळ स्नेहसंबंध जुळला.

( ११२ )

**प्रभो, तुज न मोहिनी भुलवि; मोहिला तोहि ती**
**त्यजी जन; नव्हे तशी, तुज तुझी कथा मोहिती;**
**निजानुभव तूं पहा; जशि महौषधी पारदा,**
**तुला स्थिर बळें करी, कळविलें तुवां नारदा.**

**अर्थ**—हे प्रभुजी, तुझ्या मोहिनीनें ( सगळ्यांना मोहिलें, पण ) तुलामात्र मोहिलें नाहीं; शिवाय, तिनें ज्याला मोह घातला, त्याचा तिनें अखेर त्यागच केला. पण या कथेची गोष्ट अशी नाहीं. ही प्रत्यक्ष तुलाच मोह पाडते. ( ही कांहीं सांगोवांगीची गोष्ट नव्हे. ) तुम्हीं आपला स्वतःचाच अनुभव चाळून पहा. अहो, तुम्ही स्वतःच नारदाला सांगितलें आहे, कीं, ज्याप्रमाणें एकादी दिव्य औषधी चंचल पाऱ्याला घट्ट व घन करून टाकिते, त्याप्रमाणेंच तुझी कथा तुला आपल्या आकर्षक सामर्थ्यानें खिळून स्तब्ध करिते.

**टिप्पणी**—'पारद'=पारा. पारा हा धातु पातळ-प्रवाही-आहे. परंतु कांहीं औषधी पदार्थांबरोबर तो खलला असतां घट्ट बनतो. नारदांना श्रीकृष्णांनीं आपलें भक्तवात्सल्य कथन केलें आहे, त्यांत एक वचन असें आहे, “नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ । मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ॥”

( ११३ )

**सुरर्षिजवळीं स्वयें वदासि, ' तत्र तिष्ठामि; ' या—**
**तुझ्याचि वचनें म्हणें तुज 'कथावश ' स्वामिया !**

**जसा स्थिर कथेंत तूं, स्थिर करीं तसें या मना;**
**स्वभक्तसुरपादपा, सफल हे असो कामना.**

**अर्थ**—नारदाला तूं स्वतःच 'तत्र तिष्ठामि' [=( माझे भक्त जेथें माझ्या चरितांचें गायन करीत असतात, ) तेथें मी स्थिर राहतों ] असें सांगितलें आहेस; आणि या तुझ्याच शब्दांच्या आधारानें, हे प्रभो, तूं आपल्या कथेला भुललेला आहेस, असें मी म्हणतों. देवा, जसा तूं आपल्या कथेच्या श्रवणांत स्थिर होतोस, त्याप्रमाणेंच या माझ्या मनाला स्थिर कर, बरें. हे भक्ताच्या कल्पवृक्षा, ही ( या भक्ताची ) इच्छा पूर्ण होवो.

**टिप्पणी**—'सुर+ऋषि'=देवर्षि, नारद. 'तत्र तिष्ठामि'-मागील केकेवरील टिप्पणी पहा. 'स्व+भक्त+सुर+पादप'=आपल्या भक्ताचा देवतरु म्ह० कल्पवृक्ष, भक्ताच्या इच्छा पुरविणारा.

( ११४ )

**सुरर्षि म्हणतो, 'तुझें यशाचि धन्य यो गायना–**
**मला, कवि म्हणोत ते सुखद अन्ययोगायना;'**
**विमुक्तिबहुसाधनें तदितरें गणीनाच तो;**
**सजूनि वरवल्लकी तव सभांगणीं नाचतो.**

**अर्थ**—नारद म्हणतो, "देवा, तुझ्या श्रेष्ठ यशाचें गायन मला घडावें; मग ज्ञाते 'योगसाधनादि दुसरे आत्मप्राप्तीचे मार्ग सुखकर आहेत,' असें पाहिजे तर खुशाल म्हणोत; ( मला त्यांच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. )" तुझ्या यशोगायनाशिवाय इतर जीं पुष्कळ मोक्षसाधनें आहेत, तीं तो हिशोबांतही घेत नाहीं. तो आपली ब्रह्मवीणा लावून वैष्णवांच्या सभेंत निश्चिन्त नाचत असतो.

**टिप्पणी**—' मला गायना यो '=मला गायाला मिळो. 'अन्य+योग+अयन'=दुसरें+योगादि साधनें+मार्ग, दुसरे योगसाधनादि मुक्तिप्राप्तीचे मार्ग, भक्ति-

मार्गाशिवाय इतर परमार्थसाधनाचे विधि. ' विमुक्ति'=मोक्ष. ' वर+वल्लकी '= उत्तम वीणा. नारदाच्या वीणेला ' ब्रह्मवीणा ' म्हणतात. 'सभा+अंगण '=सभाभूमि, वैष्णवसभेची जागा.

( ११५ )

**तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें, यास्तव—**
**प्रजापतिसुतत्व ये, करिति साधु ज्याचा स्तव;**
**स्वनीचपण मागिलें, बहु दया अशी, नारदा—**
**स्मरे घडिघडी, प्रभो ! भवपयोधिच्या पारदा !**

**अर्थ**—देवा, त्या नारदाला तुझ्या चरित्राचें श्रवण घडलें, म्हणूनच तो ब्रह्मदेवाचा असा मानसपुत्र झाला, कीं, ज्याची कीर्ति सर्व साधुसंत गात असतात. हे ( दासांना ) संसारसागराच्या पार उतरणाऱ्या प्रभो, त्या नारदाला, आपली मूळची हीन स्थिति व तुम्ही त्याच्यावर केलेली अपार दया, यांचें स्मरण हरघडी होतें.

**टिप्पणी**—' प्रजापति+सुत+त्व ' =ब्रह्मदेव+मुलगा+पदवी अगर स्थिति दाखविणारा प्रत्यय, ब्रह्मदेवाच्या मुलाची पदवी, ब्रह्मदेवाच्या मानीव पुत्राचा मान. नारद ह्या मूळचा दासीपुत्र होता. परंतु सज्जनसंगानें त्यास ईश्वरभजनाचा नाद लागून तो ऋषिपदाला पावला. अखेर ब्रह्मदेवानें त्याला आपला मानसपुत्र केला व तो भक्तिमार्गाचा आद्यनेता देवर्षि म्हणून विश्वांत गाजला. ' स्मरे '=आठवते, स्मरणांत येते.

( ११६ )

**तुझें यशचि तारितें, परि न केवला तारवे;**
**सहाय असिला असे, तरिच शत्रुला मारवे;**
**न भागवत भेटतां, न घडतांहि सत्संगती,**
**न अज्ञहृदयें तसीं तव यशोरसीं रंगती.**

**अर्थ**—देवा, तुझें यश याप्रमाणें जीवांना तारणारें आहे, परंतु त्यालासुद्धां एकट्याला दुसऱ्याच्या साह्याशिवाय हें कार्य करितां येत नाहीं. पट्टा खेळणाऱ्या वीराचें साह्य असेल, तरच तरवार शत्रूला

मारूं शकते. तसेंच, भगवद्भक्तांची भेट जोंपर्यंत झाली नाहीं, व सज्जनसंगति जोंपर्यन्त घडली नाहीं, तोंपर्यंत अज्ञान लोकांचीं अन्तः- करणें तुझ्या चरित्रकीर्तनाच्या आनंदांत रंगूं शकत नाहींत.

**टिप्पणी**—'केवला(यशा)'=एकट्या यशाला. 'सहाय'=साथीदार, साह्य करणारा.

( ११७ )

**बुडे, बुडवि सागरीं तरि, सुकर्णधाराविना;**
**सहाय नसतां स्वयें परतटासि ती दाविना;**
**सहाय भगवज्जना तव सुकीर्ति जेव्हां करी,**
**तईंच उतरी भवोदधितटीं जना लौकरी.**

**अर्थ**—चांगला सुकाण्या नसेल, तर नौका स्वतः सागरांत बुडते आणि आपल्याबरोबर खलाशी, उतारू, वगैरेंनाही बुडविते. तेव्हां ( कुशल कर्णधाराचे ) साह्यावांचून ती आपण होऊनच स्वतःच्या जोरावर परतीर दाखवूं शकत नाहीं. तद्वत्, तुझी कीर्ति जेव्हां भग- वद्भक्तांचें साह्य संपादन करिते, तेव्हांच ती या संसारसागराच्या परतीरीं जीवांना लौकर उतरूं शकते.

**टिप्पणी**—' तरि'=नौका, नाव. ' सु+कर्ण+धार'=कुशल सुकाणूं धरणारा, हुशार सुकाण्या. ' सहाय '=साथीदार, साह्य करणारा. ' भगवज्जना सहाय करी'= भक्तांना आपले साथीदार करिते, भक्तजनांचें साह्य मिळविते.

( ११८ )

**सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो,**
**कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो;**
**सदंघ्रिकमळीं दडो, मुरडितां हटानें अडो,**
**वियोग घडतां रडो, मन भवच्चरित्रीं जडो !**

**अर्थ**—( म्हणून, हे परमेश्वरा, माझें मागणें इतकेंच आहे, कीं, )

मला निरंतर सत्संग लाभो, सज्जनाचेंच भाषण माझ्या कानावर येवो, मनाचा पापदोष झडून जावो, ऐहिक सुखोपभोगाचा सर्वस्वीं वीट येवो. साधुसंतांच्या कमलासारख्या निर्मळ व कोमल चरणांचा आसरा माझ्या मनाला मिळो, त्यांनीं दूर ढकलिलें असतां हट्टानेंच त्यानें तेथें अडून राहावें, आणि इतकें करूनही त्या साधुचरणांचा वियोग झालाच तर त्यानें ( पोटभर ) रडावें, ( तरी पण ) त्यानें तुमच्या चरित्रांच्या पवित्र कथेंत नेहमीं रंगून जावें !

**टिप्पणी**—' सत्+अंघ्रि+कमळीं '=साधूंचा चरण हेंच कमळ. ' मुरडितां '=मागें ढकलतां. ' भवच्चरित्र '=तुमची कथा.

( ११९ )

**न निश्चय कधीं ढळो, कुजनविघ्नबाधा टळो;**
**न चित्त भजनीं चळो, मति सदुक्तमार्गीं वळो,**
**स्वतत्त्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो,**
**पुन्हा न मन हें मळो, दुरित आत्मबोधें जळो.**

**अर्थ**—माझें मन कधींही डळमळीत न होवो. दुष्टांनीं केलेल्या विघ्नांचा उपद्रव दूर होवो. चित्त तुमच्या भजनांत निश्चळ राहो. साधूंनीं सांगितलेल्या मार्गाकडे अन्तःकरण लागो. हृदयाला आत्मज्ञान लाभो. खोटा अभिमान साफ नाहींसा होवो. एकदा स्वच्छ होऊन भक्तिमार्गाला लागलेलें मन पुन्हां विषयलालसेनें मळीण न होवो, आणि खऱ्या आत्मज्ञानानें सर्व पापाचें भस्म होवो.

**टिप्पणी**—' सद्+उक्त+मार्ग '=साधूंनीं सांगितलेला वर्तनक्रम. ' स्व+तत्त्व '=आपलें खरें स्वरूप, स्वतःविषयीं यथार्थ ज्ञान. ' दुरित '=पाप. ' आत्म+बोध '=ब्रह्मज्ञान, सर्व विश्व हें ईश्वराचेंच स्वरूप, तेव्हां मी ईश्वरस्वरूपच आहें, अशा प्रकारचें वेदान्त तत्वज्ञान.

(१२०)

**मुखीं हरि वसो तुझी कुशलधामनामावली,**
**क्षणांत पुरवील जी सकळ कामना मावली;**
**कृपा करिसि तूं जगत्त्रयनिवास दासांवरी,**
**तशी प्रकट हे निजाश्रितजनां सदा सांवरी.**

**अर्थ**—हे परमेश्वरा, सर्व कल्याणांचें वसतिस्थान, क्षणांत सर्व इच्छा पुरविणारी व दयाळू अशी तुझी नामावळी माझ्या तोंडीं राहो. त्रिभुवनास व्यापून राहणारा तूं दासांवर जशी दया करितोस, तशीच ही तुझी नामावळीही दासांना नेहमीं सांवरून धरिते, ही गोष्ट अगदीं स्पष्ट दिसणारी आहे.

**टिप्पणी**–'कुशल+धाम+नाम+आवली'=कल्याण+स्थान+नाम+माला. 'जगत्+त्रय+निवास'= त्रिभुवन आहे वसतिस्थान ज्याचें तो. बहुव्रीहि स० ' सांवरी" =सांभाळते.

(१२१)

**दयामृतघना, अहो हरि, वळा मयूराकडे;**
**रडे शिशु, तयासि घे कळवळोनि माता कडे**
**असा अतिथि, धार्मिकस्तुतपदा! कदा सांपडे?**
**तुम्हां जड भवार्णवीं उतारितां न दासां पडे.**

**अर्थ**—हे दयामृताच्या मेघा हरे, या मयूराकडे (=मोराकडे, पक्षीं मोरोपंत कवीकडे) प्रसाद करण्याच्या हेतूनें वळा. जें मूल रडतें, त्याला त्याची आई मोठ्या कळवळ्यानें उचलून कडेवर घेते. धर्मनिष्ठांनीं ज्याच्या पावलांची स्तुति केली आहे अशा परमेश्वरा, असा याचक आपल्याला कोठें आढळेल? आपले दास पापभारानें कितीही जड झाले असले, तरी या संसारसागरांत त्यांना उचलून परतीराला लावणें तुम्हांला खास कठीण नाहीं.

# उपसंहार.

**कारुण्यांभोद राम प्रियसख, गुरुही, जो मयूरा नटाचा,**
**होतां तापत्रयार्त, त्वरित भववनीं रक्षिता रानटाचा,**
**त्याचें साचें स्वभद्र स्मरण, मग न त्या तें कसें ये कवीस ?**
**केका, एका सख्यातें स्मरुनि, करि अशा येकसें येकवीस.**

**अन्वय**—(या) मयूरा नटाचा प्रियसख (आणि) गुरुही, (तसाच) भववनीं तापत्रयार्त होतां, या मयूरा रानटाचा त्वरित रक्षिता, जो कारुण्यांभोद राम, त्याचें स्मरण साचें स्वभद्र (होय), मग तें (स्मरण) त्या (मयूर) कवीस कसें न ये ? (ह्मणून) त्या एका सख्यातें (रामातें) स्मरून (हा मयूर कवि) अशा येकसें येकवीस केका करी.

**अर्थ**—या थयथय नाचणाऱ्या मोराचा आवडता मित्र व (नाट्य शिकविणारा) अध्यापक आणि संसारवनांत त्रिविध तापानें होरपळत असतां, या संसाराच्या रानांत राहणाऱ्या रानवट मोराचें (पक्षीं मोरोपंतांचें) उत्सुकतेनें रक्षण करणारा, जो रामरूपी दयाघन त्याचें स्मरण हेंच त्या मोराचें खरें आत्मकल्याण होय, मग त्या (मयूर) कवीला तें स्मरण कसें बरें घडणार नाहीं ? (तें घडणारच, आणि ह्मणून तर) तो त्या रामसख्याला आठवून अशा प्रकारें एकशें एकवीस केकांचा टाहो फोडीत आहे.

**टिप्पणी**—पूर्वार्ध-कवीचें म्हणणें असें कीं, राम हा दयेचा मेघ आहे मी नाचणाऱ्या मोरासारखा प्रेमवेडा आहें. राममेघाबद्दल माझ्या अंतःकरणांत अपरंपार प्रेम आहे. त्याच्या स्मरणानें, मी नाचावयास लागतों. तेव्हां या नटनकौशल्यांत तो राममेघच माझा गुरु आहे. आसपास पेटणारे या संसारवनांतील तापत्रयाचे वणवे जेव्हां या रानांत वावरणाऱ्या मला लागतात, तेव्हां तोच दयाघन घाईनें धांवणें करून मला संभाळीत असतो. अशा प्रकारें या भोळ्या, वेड्या मोराचा तो दयाघन प्रियसखा, गुरु (= नटन विद्येचा अध्यापक) व रक्षिता आहे. 'स्व+भद्र'=आपलें कल्याण. 'तापत्रय'= शरीराचे, मनाचे, व भूतमात्रापासून होणारे, तीन प्रकारचे ताप. 'एक सखा'= ज्याच्या सारखा दुसरा मित्रच नाहीं असा, 'येकसें येकवीस'=एकशें एकवीस.

**समाप्त.**